# जनमनातील जन-गण-मन

मिलिंद प्रभाकर सबनीस

■

संपादन

आनंद हर्डीकर

■

© सौ. शिल्पा मिलिंद सबनीस

१२९९, शुक्रवार पेठ, गुरुराज अपार्टमेंट,

सुभाषनगर, आठवी गल्ली, पुणे २.

दूरध्वनी : ०२०-२४४९३९१७.

E-mail:sabnisvandemataram@gmail.com

■

प्रकाशक :

स्वानंदी प्रकाशन

सौ. अपर्णा मकरंद केळकर

सरगम, रघुकुल सोसायटी,

कर्वेनगर, पुणे ५२

दूरध्वनी : ०२० - २५४२०८१२,

मो. : ०९४२२९८७५४१

E-mail:swanandik@rediffmail.com

■

वितरक




दुकान क्र. ७८,

गिरीजाशंकर विहार सोसायटी,

सहवास सोसायटी जवळ,

पोतनीस परिसर समोर,

महर्षी कर्वेनगर, पुणे-५२

संपर्क : ०९८२२०१२२६६, ०९४२२०२५४३१

email : aisee.akshare@gmail.com

websit : www.aiseeakshare.com

■

अक्षरजुळणी :

गणेश एंटरप्रायजेस

गणेश भुजबळ

मो. : ९९२२९५३६२७

■

मुद्रितशोधन :

सौ. लीना जोशी

■

मुखपृष्ठावरील चित्र

सचिन जोशी

■

मुखपृष्ठ व मांडणी :

शरद प्रभुदेसाई

■

अर्पणपत्रिकेतील काव्य :

सौ. चारूता शरद प्रभुदेसाई

■

मुद्रक :

अजित ठोंबरे

प्रतिमा ऑफसेट

देवगिरी इंडस्ट्रियल इस्टेट,

कोथरुड इंडस्ट्रियल इस्टेट,

पुणे ३८

दूरध्वनी : (०२०) २५४६०२१६

■

प्रथम आवृत्ती :

२७ डिसेंबर २०११

'जन-गण-मन' शताब्दी दिन

■

किंमत : रु. २०० /-

हे राष्ट्राचे गीत चिरंतन
देते नवचेतना
भारत भाग्यविधात्यास्तवनी
रमते कविवंदना



'जन-गण-मन' या शब्दांमध्ये
समस्त भारतीयांची भावशक्ती प्रगट करणारे
'महामानव' रवीन्द्रनाथ यांच्या
अलौकिक प्रतिभेला समर्पण

## ‘जन–गण–मन’ – मूळ बंगाली : रवीन्द्रनाथ ठाकुर

जनगणमन–अधिनायक जय हे भारतभाग्यविधाता ।
पंजाब सिन्धु गुजराट मराठा द्राविड़ उत्कल वङ्ग
विन्ध्य हिमाचल यमुना गङ्गा उच्छल जलधितरङ्ग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस माँगे,
गाहे तव जयगाथा ।
जनगणमङ्गलदायक जय हे भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।१।।

अहरह तव आह्वान प्रचारित, शुनि तव उदार वाणी
हिन्दु बौद्ध शिख जैन पारसिक मुसलमान खृस्टानी
पूरब पश्चिम आसे तव सिंहासन–पाशे,
प्रेमहार हय गाँथा।
जणगण–ऐक्यविधायक जय हे भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।२।।

पतन–अभ्युदय–बन्धुर पन्था, युग–युग धावित यात्री––
हे चिरसारथि, तव रथचक्रे मुखरित पथ दिनरात्रि ।
दारुण विप्लव–माझे तव शंङ्खध्वनि बाजे
संकटदु:खत्राता।
जनगणपथपरिचायक जय हे भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।३।।

घोर तिमिरघन निविड़ निशीथे पीड़ित मूर्छित देशे ।
जाग्रत छिल तव अविचल मङ्गल नतनयने अनिमेषे ।
दु:स्वप्ने आतङ्के रक्षा करिले अङ्के
स्नेहमयी तुमि माता।
जनगणदु:खत्रायक जय हे भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।४।।

रात्रि प्रभातिल, उदिल रविच्छवि पूर्व–उदयगिरिभाले,
गाहे विहङ्गम, पुण्य समीरण नवजीवनरस ढाले,
तव करुणारुणरागे निद्रित भारत जागे
तव चरणे नत माथा ।
जय जय जय हे, जय राजेश्वर भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।५।।

‘गीत–पश्चशती’ (रवीन्द्रनाथांच्या बंगाली गीतांचे देवनागरीत लिप्यंतर) संपादन – इन्दिरादेवी चौधुराणी, प्रकाशक – साहित्य अकादमी, नवी दिल्ली या पुस्तकानुसार ‘जन–गण–मन’ हे गीत घेतले आहे.

# भूमिका

स्वतंत्र भारताचे राष्ट्रगीत 'जन-गण-मन', 'राष्ट्रध्वज' आणि 'राजमुद्रा' या तीन राष्ट्रीय मानचिन्हांचा इतिहास, घटनात्मक स्थान यांविषयी विस्तृतपणे लिहायचे ठरवले. त्यांतील प्रथम 'राष्ट्रध्वज - प्राचीन ते अर्वाचीन' हे पुस्तक प्रकाशित झाले आहे व आता 'जन-गण-मन'च्या शताब्दी वर्षातच या गीताविषयीचे हे पुस्तक पूर्ण होत आहे.

या निमित्ताने 'जन-गण-मन'विषयी असलेले आक्षेप व गैरसमज साधार दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. १९९९ मध्ये 'वन्दे मातरम्'चा अभ्यास करत असताना ज्येष्ठ संपादक व लेखक कै. उत्तमराव कानिटकर यांनी 'वन्दे मातरम्च्या बरोबर 'जन-गण-मन'ची तुलना न करता आज राष्ट्रगीत असलेल्या 'जन-गण-मन'ला कमी लेखू नका. ते पंचम जॉर्जसाठी लिहिलेले गीत नाही, ही वस्तुस्थिती मांडलीच पाहिजे', असे आग्रहाने सांगितले होते. कै. कानिटकर यांचेही स्मरणपूर्वक आभार.

डॉ. मृणालिनी गडकरी या रवीन्द्रनाथांच्या काव्याच्या अभ्यासक आणि बंगाली साहित्याच्या मराठीत अनुवाद करणाऱ्या ज्येष्ठ अनुवादिका व 'जन्मदा प्रतिष्ठान'च्या हितचिंतक आहेत. रवीन्द्रनाथांच्या मूळ बंगाली काव्याचे अनेक संदर्भ व अर्थ याविषयी वेळोवेळी मला मार्गदर्शन केले व या पुस्तकासाठी प्रस्तावनाही लिहून दिली. त्यांचे मनापासून आभार.

या पुस्तकासंदर्भात सर्वांत महत्त्वाचे आभार माझे मार्गदर्शक श्री. आनंद हर्डीकर यांचे मानायला हवेत. अत्यंत चिकित्सकपणे त्यांनी या लेखनासंदर्भात, त्यातील ऐतिहासिक घटनांविषयी मार्गदर्शन केले. या निमित्ताने त्यांचे मिळालेले मार्गदर्शन, वेळोवेळी त्यांच्याशी झालेली चर्चा निश्चितच अत्यंत उपयुक्त ठरली. या पुस्तकाचे संपूर्ण संपादन त्यांनी आत्मीयतेने केले आहे.

'वन्दे मातरम्'सह या राष्ट्रीय प्रतीकांच्या लेखनासाठी नेहमीच मदत करणारे माझे मित्र चित्रकार श्री. सचिन जोशी, पुस्तकाची मांडणी करणारे श्री. शरद प्रभुदेसाई तसेच या पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी घेणारे श्री. मकरंद केळकर यांचेही मी आभार मानतो.

गुरुदेव रवीन्द्रनाथांच्या १५० व्या जयंतीच्या वर्षात व 'जन-गण-मन'च्या शताब्दी वर्षाच्या निमित्ताने आपला मानबिंदू असणाऱ्या राष्ट्रगीताचा मथितार्थ समजावा, त्यातील भावनांचा स्पर्श मनाला होऊन संपन्न राष्ट्रनिर्मितीची प्रेरणा मिळावी, हीच अपेक्षा.

**– मिलिंद प्रभाकर सबनीस**

# प्रस्तावना

**२७ डिसेंबर १९११ या दिवशी** रवीन्द्रनाथ टागोर यांनी लिहिलेल्या **'जन-गण-मन अधिनायक'** या गीताचे प्रथम गायन झाले. हे गायन भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या सव्विसाव्या अधिवेशनात, अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशी बारा वाजता केले गेले. आता हे गीत आपले राष्ट्रगीत म्हणून मान्यता पावले आहे. या राष्ट्रगीताच्या प्रथम गायनाला या वर्षी शंभर वर्षे पूर्ण होत आहेत आणि जग या गीताच्या रचनाकाराचे दीडशेवे जन्मवर्ष साजरे करत आहे, हा मणिकांचन योग आहे. याच काळात 'जन-गण-मन'साठी चार शब्द लिहिण्याची संधी मला मिळत आहे, ही माझ्या दृष्टीने अत्यंत आनंदाची गोष्ट आहे.

रवीन्द्रनाथ टागोरांची ओळख करून देण्याची आवश्यकता नाही. आशियातील पहिले नोबेल पारितोषिकविजेते कवी म्हणून आपण त्यांना ओळखतो. पण रवीन्द्रनाथ टागोर हे एक तत्त्वचिंतक कवी आणि थोर राष्ट्रभक्त होते, हेही आपण लक्षात ठेवायला हवे. त्यांनी साधारणपणे पासष्ट-एक राष्ट्रभक्तिपर कविता लिहिल्या आहेत. या कवितांना एका तात्त्विक विचाराचा आधार आहे. त्यांना स्वदेश, स्वभाषा, स्वसंस्कृती यांबद्दल प्रेम आणि आदर होता. या कवितांतून तो स्पष्ट होतो. पण त्यांचा राष्ट्रवादाचा विचारही याच कवितांमधून समजतो. हा विचार मात्र इतरांपेक्षा वेगळा आहे; कारण त्यांचा पिंड उपनिषदांवर पोसला गेला असल्याने प्राचीन भारतीय राष्ट्रीय विचार त्यांना पटला होता.

रवीन्द्रनाथांची अशी धारणा होती की, प्रत्येक राष्ट्राने आपले एक 'जीवितध्येय' निश्चित केलेले असते. ते युगानुयुगे त्याच्या हाडीमासी खिळलेले असते. त्या राष्ट्राच्या प्राणात, बुद्धीत, संकल्पांत, प्रवृत्तीत हीच 'राष्ट्रीय भावना' म्हणजेच 'मिशन' रुजलेले असते. या मिशनद्वारा राष्ट्र आपल्यातील एकांगिता दूर करून, परिपूर्ण बनण्याचा प्रयत्न करत असते. त्यामुळे कालमानाप्रमाणे जरी बाकी विचारांत फरक पडला, आज ज्याला प्रधान मानले, त्यालाच उद्या गौण ठरवले, परवा त्याज्य ठरवले किंवा अनेक विचारांच्या मिश्रणातून नवीन विचार घडवला, तरी राष्ट्राची मूळ भावना कायमच राहते आणि राष्ट्र त्या भावनेकडे ओढले जाते. या विशिष्ट राष्ट्रीय

भावनेमुळे अथवा मिशनमुळे त्या राष्ट्राला विश्वाची विशिष्ट सेवा करण्याची योग्यता प्राप्त होते. त्या राष्ट्राला त्यामुळेच विश्वात अनन्यसाधारण स्थान मिळते, ते 'मिशन' हाच त्या राष्ट्राचा 'स्वधर्म' असतो.

भारताचे असे विशिष्ट आणि चिरंतन 'मिशन' कोणते? तर 'एकत्व म्हणजे काय', हे भारताने शोधून काढले. एकनिष्ठेत एकांगिता येता कामा नये. एकत्व म्हणजे पूर्णत्व. एकत्व म्हणजे सर्वसमन्वय. एकत्व म्हणजे विश्वकुटुंबकम् किंवा उपनिषदाचा आवडता आणि गोड शब्द वापरायचा झाला, तर 'एकनीडम्'. येथे सर्वांना स्थान आहे. सर्वांचा स्वीकार आहे. याचेच दुसरे नाव 'अहिंसा'. यातूनच बंधुतेचा, आत्मीयतेचा उदय होतो.

*''सार्थक जनम आमार जन्मेछि एइ देशे ।*
*सार्थक जनम मा गो, तोमाय भालबेसे ।।*
*जानि ने तोर धन रतन, आछे कि ना रानीर मतन,*
*शुधु जानि आमार अंग जुडाय तोमार छायाय एसे ।।''*

(''या देशात जन्माला आलो म्हणून माझ्या जन्माचे सार्थक झाले. माते, तुझ्यावर प्रेम केले आणि माझा जन्म सार्थकी लागला. तुझ्याकडे किती रत्नभांडार आहे, ते मला माहीत नाही; तू राणीसारखी आहेस का, हेही ठाऊक नाही. मला फक्त एवढेच ठाऊक आहे की, तुझ्या सावलीत मला शांती मिळते.'')

आपला देश पारतंत्र्यात खितपत पडला असताना, दुःखदैन्याने गांजला असताना, रवीन्द्रनाथ त्याचा अभिमान बाळगून वरील उद्गार काढतात; कारण जगाच्या कल्याणासाठी युगानुयुगे त्याने थोर आणि अपूर्व साधना केली आहे म्हणून. तो सर्वांचाच स्वीकार करतो, कुणालाच तो नाकारत नाही, सर्वांचा संग्रह करून त्यांच्यात तो समन्वय साधण्याची पराकाष्ठा करतो. सर्व पंथांच्या, वंशांच्या, संप्रदायांच्या तपस्येतला ग्राह्यांश ग्रहण करून विश्वमानवाच्या महान जीवनमूल्यांचा तो शोध घेतो आणि जिवापाड जपलेला हा ठेवा अखिल मानवजातीला देण्याच्या ध्यासात प्रसंगी आपला अभ्युदयही गमावण्यास तयार होतो. म्हणूनच तो रवीन्द्रनाथांना पूजनीय वाटतो.

भारताच्या या अलौकिक 'मिशन' किंवा 'स्वधर्मा'मुळेच, स्वदेशात त्यांना विश्वदेवाचे दर्शन घडते.

*हे बिश्वदेब, मोर काछे तुमि देखा दिले आज कि बेशे ।*
*देखिनु तोमारे पूर्बगगने, देखिनु तोमारे स्वदेशे ।।*

विश्वदेवाचे हे रूप कसे आहे? तर नील गगन त्याचे ललाट आहे. स्वच्छ प्रकाशात त्याला अखंड उज्ज्वलता आली आहे. मौन आशीर्वादाप्रमाणे असलेला हा हिमालय त्याचा निर्भयतेचा वर देणारा हस्त आहे. हा सागर त्याचे चरण धुतो आहे. जान्हवीरूपी हार त्याच्या वक्षावर रुळत आहे. मन मोकळे करून, बाहेर डोकावून पाहताच लक्षात येते की, विश्वाचा देव आपल्या सनातन देशातच भेटू शकतो.

आपल्या देशाचे 'मिशन' असे विश्वबंधुत्वाकडे जाणारे आहे, हे रवीन्द्रनाथांचे मत आपल्याला समजले की, 'जन-गण-मन' या गीतातील 'भारतभाग्यविधाता' कोण, याचे उत्तर आपोआपच मिळते. भारताचा 'स्वधर्म' हाच त्याचा 'भाग्यविधाता!' विशालता, सर्वसमावेशकता, अहिंसा, सहिष्णुता अशा गुणांनी तो मंडित आहे. त्यांचा हा विचार त्यांच्या 'आजि हे भारत लज्जित हे', 'हे मोर चित्त', 'शुभकर्मपथे' अशा अनेक राष्ट्रभक्तिपर कवितांतून व्यक्त झाला आहे.

''हिंदू, बौद्ध, शीख, मुसलमान, ईसाई सर्वचजण 'प्रेमाची माला जपत' 'ऐक्य विधायक भारतभाग्यविधात्या'च्या सिंहासनाजवळ जमले आहेत. उन्नती-अवनतीच्या प्राचीन पथावरून, युगानुयुगे प्रवास करणाऱ्यांना भारतभाग्यविधाता स्वत: सारथ्य करतो, मार्गदर्शन करतो. संकटात तो मातेच्या वत्सलतेने सर्वांना जवळ घेतो. झोपी गेलेला भारत आता जागा होऊन पूर्वेकडे उषेची आभा पसरत असताना, भारताच्या या राजराजेश्वराला वंदन करत आहे'', असा 'जन-गण-मन' या गीताचा उदात्त अर्थ आहे.

असे असूनही दुर्दैवाने या गीतावरून फार मोठा विवाद निर्माण झाला आणि अजूनही कधी कधी तो आपले डोके वर काढत असतो.

१९११ साली पंचम जॉर्ज भारतभेटीवर येणार होते. याच सुमारास वंगभंगच रद्द झाला होता. त्यामुळे पंचम जॉर्जचे भव्य स्वागत करण्याचे घाटत होते. रवीन्द्रनाथांचे एक दूरचे आत्मीय, सर प्रद्योतकुमार ठाकूर यांनी रवीन्द्रनाथांना त्यांनी राजासाठी स्वागत-गीत लिहावे, अशी विनंती केली. हे सर प्रद्योतकुमार इंग्रज सरकारचे निष्ठावान सेवक होते. पंचम जॉर्जवर त्यांनी छत्र धरले होते. रवीन्द्रनाथांना अशी विनंती करण्यात सर प्रद्योतकुमारांना काहीच गैर वाटले नाही. मात्र ही विनंती ऐकताच रवीन्द्रनाथांना धक्काच बसला; कारण युरोपचा स्वार्थावर आधारलेला राष्ट्रवाद त्यांना कधीच पटला नव्हता. स्वार्थासाठी एकत्र आलेली माणसे, स्वार्थ साधताच तोंड फिरवून दूर जातात, असे त्यांचे मत होते. प्रत्येक राष्ट्राने स्वत:ची उन्नती जरूर करावी, पण स्वत:चा स्वार्थ साधण्यासाठी, स्वत:च्या हावेपायी दुसऱ्या राष्ट्रांवर आक्रमण करणे, त्याचे स्वातंत्र्य नष्ट करणे, त्याची दैनावस्था करणे हे जंगलीपणाचे

लक्षण आहे. याला 'आधुनिक राष्ट्रवाद' असे गोंडस नाव लोक भले देवोत, पण तो खरा राष्ट्रवादच नव्हे, असा त्यांचा ठाम विश्वास होता. म्हणूनच आपल्या राष्ट्रीय काव्यात पुन:पुन्हा त्यांनी भारताच्या प्राचीन राष्ट्रीय विचाराची, त्याच्या 'मिशन'ची आठवण करून दिली आहे.

इंग्रजांनी भारताबद्दल केलेल्या चुकीच्या विचारांचा, धोरणांचा त्यांनी नेहमीच परखड शब्दांत निषेध केला. भाषणांतून आणि लेखांतून आपली मते स्पष्टपणे मांडली. वंगभंग आंदोलनात त्यांचा पुढाकार होता. 'स्वदेशी'ची चळवळ सुरू होण्यापूर्वीच त्यांनी स्वदेशीचा पुरस्कार केला होता.

भारताला स्वातंत्र्य मिळावे, असे त्यांना उत्कटतेने वाटत होते. मात्र आपल्या देशातील जनता ज्या मार्गांनी स्वातंत्र्य मिळवू पाहत होती, ते मार्ग त्यांना मान्य नव्हते. ''इंग्रज आपल्यावर राज्य करायला आले आहेत, तेव्हा ते आपले हित पाहतील, अशी अपेक्षा करणे चूकच! तोंड वेंगाडून, लाचारी करून, भीक मागून आपल्याला स्वातंत्र्य कधीही मिळणार नाही. तसेच काही इंग्रजांना मारून, सूडभावनेने वागूनही पारतंत्र्य दूर होणार नाही. त्यासाठी आपण सर्वांनी एक झाले पाहिजे. मतभेद मुळापासून निपटून काढले पाहिजेत. स्वावलंबी आणि संघटित होऊन, सहकार्याची कास धरली पाहिजे. याची सुरुवात लहान लहान गावांपासून केली पाहिजे. प्रत्येक बाबतीत राज्यकर्त्यांवर अवलंबून राहता कामा नये. आपण सर्व एक झालो की, आपण गमावलेले आत्मिक बळ आपल्याला परत मिळेल आणि मग स्वातंत्र्य मिळवणे सोपे जाईल'', असे त्यांचे विचार होते.

रवीन्द्रनाथ नुसते विचार मांडूनच थांबले नाहीत, तर त्यांनी आपले विचार प्रत्यक्ष कृतीत आणण्याचा प्रयत्न केला. स्वत:च्या जमीनदारीच्या गावांतून ग्रामोद्धाराची सुरुवात केली, शेतीवर प्रयोग केले, लघुउद्योगांना उत्तेजन दिले, पतपेढ्या स्थापन केल्या, आरोग्य, शिक्षण यांकडे लक्ष दिले. त्यांचे विचार आणि कार्य याची त्या काळातील काहींनी थट्टा केली. त्यांना हे सर्व अव्यवहारी वाटले. रवीन्द्रनाथ कवी आहेत ना, मग त्यांनी कविताच लिहाव्यात! म्हणूनच प्रद्योतकुमारांच्या विनंतीने रवीन्द्रनाथ संतापले, 'मी काय इंग्रज राजाचा भाट आहे का!' असाच विचार त्यांच्या मनात आला असणार. त्यांनी प्रद्योतकुमारांना स्पष्ट नकार दिला आणि रागाच्या आवेगात पंचम जॉर्जऐवजी 'भारतभाग्यविधात्या'चे स्तवन केले.

प्रद्योतकुमारांना 'जन-गण-मन' हे पंचम जॉर्जसाठी लिहिलेले नाही, हे लक्षात आले आणि त्यांनी त्यांचे मित्र संगीतकार दक्षिणाचरण सेनांना हाताशी धरून आणखी एक गाणे लिहून घेतले. पंचम जॉर्जच्या स्वागताच्या वेळी 'जन-गण-मन' म्हटले

गेले नाही. कुणी इंग्रजांनी ते ऐकले, तेव्हा म्हणे त्यांना त्यात निष्ठेचा अभाव आढळला!

काँग्रेस अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशी ते गायले गेले. त्यानंतर पंचम जॉर्जच्या स्वागताचा आणि वंगभंग रद्द झाल्याबद्दल बादशहाच्या आभाराचा असे दोन ठराव मंजूर झाले. त्यानंतर एका अज्ञात कवीने लिहिलेले हिंदी गीत म्हटले गेले. हा सर्व वृत्तांत 'बेंगॉली' या वर्तमानपत्राने व्यवस्थित छापला असला, तरी 'स्टेट्समन', 'इंग्लिशमन' आणि 'इंडिया' यांनी घोटाळा केला. हा घोटाळा जाणूनबुजून झाला की दोन भाषांमधील फरक न कळल्याने झाला, कोण जाणे! पण रवीन्द्रनाथांचे हे गीत पंचम जॉर्जच्या स्वागतासाठीच होते, असा अपप्रचार या वर्तमानपत्रांनी केला. सामान्यांचा अपप्रचारावर नेहमीच लवकर विश्वास बसतो. त्यामुळे रवीन्द्रनाथांवर टीकेची झोड उठली.

अर्थात पंचम जॉर्जच्या स्वागतासाठी हे गीत लिहिले नव्हते, यासाठी भरपूर ठोस पुरावे उपलब्ध आहेत. रवीन्द्रनाथांचा राष्ट्रीय विचार स्पष्ट झाला की, या गैरसमजावर खरा तर पडदाच पडायला हवा. आणखी एक पुरावा म्हणजे २५ जानेवारीच्या माघोत्सवात हे गीत म्हटले गेले आणि माघ महिन्याच्या 'तत्त्वबोधिनी पत्रिके'त ते छापले गेले. हे गीत पंचम जॉर्जच्या स्वागतासाठी असते, तर त्या गीताला माघोत्सवात किंवा ब्राह्मोसमाजाच्या 'तत्त्वबोधिनी' मुखपत्रात स्थान कसे मिळाले असते? यात या गीताला ब्राह्मोसंगीत म्हणून स्थान दिले आहे. आणखी एक महत्त्वाचा पुरावा म्हणजे रवीन्द्रनाथांचे एक पत्र.

विश्वभारतीचे माजी विद्यार्थी पुलिनबिहारी सेन यांनी रवीन्द्रनाथांकडे या गीताच्या संदर्भात विचारणा केली असता, २० नोव्हेंबर १९३७ रोजी रवीन्द्रनाथांनी त्यांना पत्राद्वारे उत्तर दिले ते असे:

"त्या वर्षी भारतसम्राटाच्या आगमनाची तयारी चालली होती. राज्यसरकारमध्ये प्रतिष्ठित असलेल्या माझ्या एका मित्रानं सम्राटासाठी स्वागतगीत लिहिण्याचा मला आग्रह करताच प्रथम मी चकित झालो आणि नंतर मनात क्षोभाची लाट उसळली. त्याचीच प्रतिक्रिया म्हणून 'जन-गण-मन अधिनायक' या गीतात त्या भारतभाग्य, विधात्याचा जयजयकार केला, जो 'पतनअभ्युदयबंधुर पन्थाय युगयुगधाबित यात्रेकरूंचा चिरसारथी' आहे. हा जनगणांचा अंतर्यामी पथदर्शक आहे. हा युगानुयुगांचा मानवभाग्यरथचालक पंचम, षष्ठ किंवा कुठलाही जॉर्ज कधीच असू शकणार नाही, हे माझ्या राजनिष्ठ मित्रालाही कळले. कारण तो कितीही प्रबळ राजभक्त असला, तरी बुद्धिवान होता. आज मतभेदामुळे माझ्यावर लोक चिडलेत, हे काळजीचं कारण

नाही; पण लोकांचा जो बुद्धिभ्रंश झालाय, ते लक्षण बरं नव्हे.''

आपण हे गीत राष्ट्रगीत म्हणून स्वीकारले, हेही टीकेला चपखल उत्तर ठरते. आणखी एक गोष्ट येथे नमूद करावीशी वाटते आणि ती म्हणजे रवीन्द्रनाथांनी काव्याच्या बाबतीत कधीच सत्याचा मार्ग सोडला नाही. त्यांनी एके ठिकाणी स्वत:च म्हटले आहे, Consciously or unconsciously, I may have done many things that were untrue, but I have never uttered anything false in my poetry that is the sanctuary the deepest truths of my life find where refuge ('बाकी इतर वेळी मी कळत-नकळत खोटं बोललोही असेन, पण माझ्या कवितेशी मी कधीच अप्रामाणिक झालो नाही.')

याहून अधिक पुरावा काय असू शकेल?

श्री. मिलिंद सबनीस यांनी वेळेचे औचित्य साधून, 'जन-गण-मन' या आपल्या राष्ट्रगीतासंबंधित 'जनमनातील जन-गण-मन' हे पुस्तक आपल्यासाठी सादर केले आहे. हे खरोखरच कौतुकास्पद आहे. त्यासाठी त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

श्री. सबनीस यांनी हे पुस्तक अतिशय अभ्यास करून आणि कष्ट घेऊन लिहिले आहे. 'जन-गण-मन' या गीताकडे वळण्यापूर्वी त्यांनी 'राष्ट्रगीत म्हणजे काय?' आणि त्याच्या संकल्पनेमागची भूमिका यांचा उत्तम आढावा घेतला आहे. तसेच 'जन-गण-मन' या राष्ट्रगीताविषयीची सर्व तथ्ये वाचकांपुढे संकलित स्वरूपात ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळे राष्ट्रगीतासंबंधी निर्माण झालेला वाद आणि गैरसमज यांचे निश्चित निरसन होईल.

श्री. सबनीसांनी या पुस्तकात राष्ट्रगीताच्या संगीतावरही अभ्यासपूर्ण लेखन केले आहे. राष्ट्रगीत जसे महत्त्वाचे, त्याचा अर्थ जसा महत्त्वाचा, त्यातील शब्द जसे महत्त्वाचे, तसेच त्याचे संगीतही महत्त्वाचे! कारण हे सर्व घटक एकत्र आल्यामुळेच राष्ट्रगीत गाताना आणि ऐकताना सर्वांना स्फुरण चढते. सबनीस स्वत: संगीतातील जाणकार असल्याने त्यांनी संगीताबद्दल फारच चांगले विवेचन केले आहे.

'जन-गण-मन'च्या ध्वनिमुद्रणांविषयी माहितीही या पुस्तकात असल्याने हे पुस्तक म्हणजे एक संदर्भग्रंथच ठरावा.

यापूर्वी सबनीसांनी 'वन्दे मातरम्'वर असेच अभ्यासपूर्ण यशस्वी लेखन केले आहे. या पुस्तकालाही तसेच यश मिळो, ही शुभेच्छा!

**डॉ. मृणालिनी प्र. गडकरी**

# अनुक्रमणिका

# राष्ट्रगीत म्हणजे काय?

*'जन-गण-मन अधिनायक जय हे भारतभाग्यविधाता'*

हे आपल्या राष्ट्रगीताचे शब्द ऐकल्यानंतर कुठल्याही भारतीयाचे मन उचंबळून येते. विशेषत: आंतरराष्ट्रीय क्रीडास्पर्धांमध्ये आपल्या खेळाडूने नैपुण्य मिळवल्यानंतर त्याला पारितोषिक देताना आंतरराष्ट्रीय समुदायात ज्यावेळी हे स्वर गुंजतात किंवा आंतरराष्ट्रीय कार्यक्रमात हे शब्द आपल्या कानी येतात, त्या त्या वेळी आपल्या राष्ट्रगीताच्या अभिमानाने आपले मन भरून येते.

हे स्वर, हे राष्ट्रगीताचे शब्द आपल्या प्रियतम मातृभूमीची जशी आठवण करून देतात तशीच तिच्याबद्दल असलेल्या आपल्या कर्तव्यांचीही आपल्याला आठवण करून देतात.

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशी भारत ब्रिटिशांच्या जोखडातून स्वतंत्र झाला. भारत आणि पाकिस्तान अशा दोन तुकड्यांमध्ये त्याचे विभाजनही झाले. या प्रथम स्वातंत्र्यदिनी भारताचा निश्चित झालेला राष्ट्रध्वज फडकवला गेला. २२ जुलै १९४७ रोजी पंडित नेहरूंनी घटना समितीपुढे ध्वजाविषयीचा ठराव मांडला होता. व त्या ठरावानुसार त्याच वेळी राष्ट्रध्वज निश्चित झाला होता. परंतु राष्ट्रगीत मात्र निश्चित झाले नव्हते. स्वातंत्र्यापूर्वी डिसेंबर १९४६ मध्ये स्थापन झालेल्या घटना समितीचे काम पुढे तीन वर्षे चालून, २४ जानेवारी १९५० या दिवशीच्या घटना समितीच्या अखेरच्या बैठकीत कविवर्य रवीन्द्रनाथ यांनी लिहिलेल्या 'जन-गण-मन' या गीताला राष्ट्रगीताचे स्थान दिल्याचे जाहीर केले गेले. २६ जानेवारी १९५० या दिवसापासून भारताची राज्यघटना अधिकृतरीत्या अमलात आली व प्रथमत: त्याच दिवशी स्वतंत्र भारताचे अधिकृत राष्ट्रगीत म्हणून 'जन-गण-मन'चे स्वर निनादले. या घटनेपूर्वी सुमारे ४० वर्षे म्हणजे १९११ मध्ये रवीन्द्रनाथांनी लिहिलेल्या या गीताबद्दल आजही अनेक दंतकथा, गैरसमज आहेत. या गीताभोवती संशयाचे धुके आहे.

आज भारतीय स्वातंत्र्याला ६४ वर्षे पूर्ण झाली आहेत. त्यानिमित्ताने या गीताच्या इतिहासाबद्दल आणि वर्तमानकाळातील त्याच्या स्थानाबद्दल घटनात्मकदृष्ट्या घेतलेला हा एक वेध आहे.

## राष्ट्रगीत म्हणजे काय?

आपल्या राष्ट्राच्या गौरवार्थ किंवा सन्मानार्थ गायले जाणारे गीत म्हणजे राष्ट्रगीत, अशी राष्ट्रगीताची अगदी सोपी, सुटसुटीत, सर्वसाधारण व्याख्या करता येईल.

प्रत्येक राष्ट्रगीत हे देशभक्तिपर गीत असतेच; पण प्रत्येक देशभक्तिपर गीतात राष्ट्रगीताला आवश्यक असणारी योग्यता असेलच, असे नाही.

राष्ट्रगीताची संकल्पना प्रत्येक देशानुरूप बदलत असते. त्या देशाचा इतिहास आणि भूगोल यांवर ती संकल्पना अवलंबून असते. राष्ट्रगीत म्हणजे केवळ देशाचा इतिहास, परंपरा किंवा सृष्टिसौंदर्याचे वर्णन असणारे गीत नव्हे. प्रत्येक देशाच्या राष्ट्रगीताची संकल्पना स्वतंत्र आहे. इतर अनेक देशांची राष्ट्रगीते अभ्यासली, तर हा फरक ठळकपणे जाणवतो. फिलीपाईन्स, जर्मनी यांसारख्या काही देशांनी आपल्या राष्ट्रगीतामध्ये देशाला मातृभू असे म्हटले आहे, तर स्वित्झर्लंडसारख्या देशाच्या राष्ट्रगीतात आपल्या देशाला पितृभू असे म्हटले आहे. फ्रान्ससारख्या देशाचे राष्ट्रगीत हे त्यांच्या ऐतिहासिक फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी एका सैनिकाला स्फुरलेले क्रांतिगीत आहे. अमेरिकेचे राष्ट्रगीत हे ध्वजगीत आहे, तर जपानचे राष्ट्रगीत हे राजनिष्ठ प्रजाजनांचे प्रार्थनागीत आहे.

एखादे क्रांतिगीत, ध्वजगीत किंवा राजाच्या स्तुतिप्रद असे प्रार्थनागीत अशा प्रकारची गीते राष्ट्रगीताच्या स्थानावर विराजमान होऊ शकतात; परंतु भारतीय संस्कृतीत राष्ट्रगीताच्या संदर्भात वेगळा विचार आहे.

ह्या देशात गेल्या १५-१६ शतकांमध्ये भक्तिवाङ्मय मोठ्या प्रमाणात निर्माण झाले. अर्थातच त्याला इथला संपन्न आध्यात्मिक वारसा कारणीभूत आहे. विविध भक्तिसंप्रदायांनी या समाजावर एक मोठा प्रभाव पाडलेला आहे. भक्ती हा भारतीय संस्कृतीचा अविभाज्य घटक आहे. इथे प्राचीन काळापासून विविध धर्म, विविध पंथ जन्मले आणि वाढले. ईश्वराची साधना अर्थात भक्ती करण्याचे प्रत्येकाचे मार्ग वेगवेगळे होते. या भक्तिभावनेतूनच भूमीला देव मानण्याची संकल्पना वैदिक काळात पुढे आली. वेदवाङ्मयात तर निसर्गातील शक्तींनाच देवता मानले आहे. पंचमहाभूतांपैकी प्रथम स्थान असलेल्या पृथ्वीला देवतास्वरूप मानले आहे. ज्या भूमीवर किंवा पृथ्वीच्या ज्या भूभागावर आपण जन्माला आलो, त्यालाच देवतास्वरूप देऊन त्याची उपासना होऊ लागली. वैदिक काळातील अनेक सूक्ते, अनेक रचना भूमातेचे भक्तिगान करणाऱ्या आहेत. अथर्ववेदातील पृथ्वीसूक्तांना एकत्रितपणे आद्य राष्ट्रगीत मानता येईल.

ज्या प्रमाणात भक्तिवाङ्मय निर्माण झाले, त्या प्रमाणात इतर प्रकारचे वाङ्मय निर्माण झाले नाही. मग ज्याला राष्ट्रीय विचारांचे वाङ्मय म्हणता येईल, अशा वाङ्मयाचा विचार इथल्या प्राचीन वाङ्मयकारांनी केलाच नव्हता काय, असा प्रश्न

घडू शकतो. समाजाचे, विश्वाचे कल्याण इच्छिणाऱ्या अनेक रचना वेद आणि भक्तिवाङ्मयामध्ये विखुरलेल्या आहेत.

## परकीय आक्रमणे

या देशावर अलेक्झांडरपासून सतत आक्रमणे होत राहिली. त्यातही यवनांच्या पहिल्या आक्रमणानंतर इथली संपत्ती लुटण्यासाठी टोळधाडींप्रमाणे एकापाठोपाठ एक झालेल्या क्रूर आक्रमणांमधून इथली जनता सहजासहजी सावरतच नव्हती. त्यातूनच पारतंत्र्य स्वीकारण्याची सुरक्षित पळपुटी मनोवृत्ती तयार झाली. परकीयांच्या हाताखाली त्यांच्या सैन्यात काम करणे म्हणजे आपल्या स्वदेशाशी द्रोह करणे, असा अर्थही इथल्या वीरांना कळत नव्हता. चंद्रगुप्त मौर्य, शकारी विक्रमादित्य, पंजाबचा राजा जयपाळ, अनंगपाळ, रजपूत वीर पृथ्वीराज चौहान, देवगिरीचा राजा रामदेवराय, विजयनगरचे हरीहर व बुक्क आणि कृष्णदेवराय, मेवाडचा राणा प्रताप, माळव्यात छत्रसाल, पंजाबात गुरु गोविंदसिंह, बंदा बैरागी आणि महाराष्ट्रात छत्रपती शिवाजीमहाराज यांसारख्यांनी ही पारतंत्र्याची मानसिकता बदलून टाकण्याचा पुरेपूर प्रयत्न केला. शौर्याची पराकाष्ठा केली. हा संपूर्ण कालखंड प्रचंड धामधुमीचा आणि संघर्षाचा होता, त्यामुळेच कलानिर्मितीस अनुकूल असणारे स्थैर्य इथल्या राजवटींना फारसे मिळाले नाही. त्यामुळे भक्तिवाङ्मयाखेरीज इतर प्रकारचे वाङ्मय एकूण तुलनेतच कमी प्रमाणात निर्माण झाले. महाराष्ट्रात रणांगणावर केलेल्या पराक्रमाची गाथा शाहिरी वाङ्मयातून, पोवाड्यांमधून लोकांपर्यंत पोहोचू लागली. राजस्थानमध्येही राजपूत वीरांचे पराक्रम वर्णन करणारी लोकगीते प्रचलित होऊ लागली. लोकवाङ्मयाला अशा राष्ट्रीय वृत्तीच्या काव्यरचनांनी समृद्ध केले.

ज्याला रूढार्थाने राष्ट्रभक्तिपर गीते म्हणता येतील, अशा रचना मात्र अठराव्या शतकात होऊ लागल्या. पारतंत्र्याच्या काळात राष्ट्राबद्दल मनात आलेल्या भावनांचा उद्रेक यांतून दिसू लागला. एकोणिसाव्या व विसाव्या शतकात रवीन्द्रनाथांचे बंधू सत्येंद्रनाथ, बंकिमचंद्र चट्टोपाध्याय, रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्यापासून महंमद इक्बाल, सरलादेवी चौधुराणी, स्वातंत्र्यवीर सावरकर, कवी गोविंद, सुब्रह्मण्य भारती, टी.एल.वासवानी, सरोजिनी नायडू, सेनापती बापट, अरदेसर फरामजी 'खबरदार', हरींद्रनाथ चट्टोपाध्याय, कवी न्हानालाल अशा अनेकांनी देशभक्तिपर गीते लिहिली.

## राष्ट्रगीताचे निकष

राष्ट्रगीताचे नेमके निकष काय असावेत, यावर इथे फारशी चर्चा झालेली दिसत नाही. खुद्द स्वातंत्र्यानंतर घटना समितीमध्येसुद्धा 'जन-गण-मन' आणि 'वन्दे मातरम्' यांव्यतिरिक्त कोणत्या गीतांवर चर्चा झाली, ह्याबद्दल तपशील मिळत नाहीत. 'जन-गण-मन' ला राष्ट्रगीताचे स्थान मिळाल्यानंतर या निर्णयावर टीका करणारे जे

विचारमंथन झाले, त्यावेळी याविषयी काही संकल्पना पुढे आल्या, पण त्याला
एक निश्चित बांधील स्वरूप नव्हते. भारताची सांस्कृतिक परंपरा, इथला प्राचीन
वारसा राष्ट्रगीतात यावा, अशी मते मांडणारे जसे होते, तसेच राष्ट्रगीतात भारताचे
केवळ भौगोलिक वर्णन नको, असे म्हणणारे होते.

ज्याला आदर्श राष्ट्रगीत म्हणता येईल, अशा गीतामध्ये त्या देशाच्या स्वातंत्र्याची
महती, त्या देशाची प्राचीन परंपरा, देशाचे भौगोलिक स्वरूप, वर्तमान स्थिती आणि
उज्ज्वल भवितव्याविषयी आशावाद असायला हवा. राष्ट्राची भावना त्यातून प्रकट
व्हायला हवी.

पण या सर्व गोष्टी एकाच गीतामध्ये आलेल्या आहेत, अशी उदाहरणे मात्र
फारशी दिसत नाहीत. लोकांची मानसिकता हा एक महत्त्वाचा भाग राष्ट्रगीताच्या
निवडीमध्ये असतो. आज संपूर्ण 'वन्दे मातरम्' किंवा संपूर्ण 'जन-गण-मन'
म्हणण्यासाठी लागणाऱ्या तीन-साडेतीन मिनिटे या अवधीतसुद्धा भारतीय लोक
स्थिर उभे राहात नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. ५२ सेकंदांच्या 'जन-गण-मन' या
आपल्या राष्ट्रगीताच्या गायनाच्या वेळीही सावधान स्थितीत स्थिर उभे राहण्याची
मानसिकता आपल्याकडे पुरेशा प्रमाणात आलेली नाही. त्यामुळेच आपल्या देशासाठी
राष्ट्रगीत निवडताना मूळ गीतातील एकच कडवे निवडले गेले असावे.

'भारत अमेरिकादींची राष्ट्रगीते अनेक चरणांची असली तरी फक्त पहिला
चरणच राष्ट्रीय-सण-समारंभांत गायिला वा वाजविला जातो. सर्वच कवी काही
टागोरांसारखे प्रसिद्ध नाहीत. काही राष्ट्रगीते तर कवींच्या समित्या नेमून तयार करविली
आहेत किंवा निवड केलेली आहे. ऑस्ट्रेलियाच्या राष्ट्रगीतासंबंधीची हकिगतही मोठी
विचित्र आहे. १९७२ च्या डिसेंबरमध्ये ऑस्ट्रेलियामध्ये मजूर पक्षाचे सरकार
अधिकारावर आले. ब्रिटनशी फटकून वागावयाचे धोरण असल्याने त्या सरकारने
'गॉड सेव्ह द किंग' हे परंपरागत राष्ट्रगीतही रद्द करून टाकले व नवे राष्ट्रगीत निर्माण
करण्यासाठी 'राष्ट्रगीत शोध समिती' स्थापन केली. फार काय त्यासाठी रचनाकारांना
९० हजार रुपयांचे पारितोषिकही जाहीर केले. सुमारे १३०० गीते सादर केली गेली.
त्यातून 'साँग ऑफ ऑस्ट्रेलिया' व 'ॲडव्हान्स ऑस्ट्रेलिया फेअर' ही गीते निवडली
गेली. पण जनतेस ही दोनही गीते रडकी वाटली. व नवे राष्ट्रगीत निवडले जाईपर्यंत
'गॉड सेव्ह द किंग' हेच गीत चालू राहावे असे ठरले.' (देशोदेशीची राष्ट्रगीते, वा.भ.
जोशी, एकता, १५ ऑगस्ट १९७२)

भारताच्या राष्ट्रगीताचा विचार केला तर त्याचे चित्र वेगळे आहे. अलीकडच्या
दीडशे वर्षांच्या काळात भारतामध्ये जी राष्ट्रभक्तिपर गीते लिहिली गेली, त्यांत काही
भौगोलिक वर्णनात्मक आहेत, तर काही परंपरेचा गौरव करणारी गीते आहेत. तर
काही गीते त्या त्या प्रांताचे महत्त्व सांगणारी आहेत. देशभक्तिपर गीतांमध्ये बंकिमचंद्रांचे
'वन्दे मातरम्', रवीन्द्रनाथांचे 'भुवन मनमोहिनी', इक्बाल यांचे 'हिंदुस्थान हमारा' (स



१८५७ च्या स्वातंत्र्यलढ्यातील सेनानी व प्रखर कवी अझिमुल्लाखान.



'सरफरोशी की तमा' हे गीत लिहिणारे भगतसिंगांचे सहकारी पं. रामप्रसाद बिस्मिल.

जहाँ से अच्छा), स्वातंत्र्यवीर सावरकरांचे 'सकल जगामध्ये छान अमुचा प्रियकर हिंदुस्थान' अशी गीते सांगता येतील.

काही गीतांमध्ये प्राचीन भारताच्या परंपरेचे वर्णन दिसते. त्यात सरोजिनी नायडूंचे 'Eternal India', सत्येंद्रनाथ ठाकूरांचे 'हिंदपुत्र' अशी गीते आहेत, तर काही गीतांमध्ये 'उठा, जागे व्हा, देशाच्या भवितव्याचा विचार करा', असा इशारा दिलेला आढळतो.

भारताच्या प्रांतिक रचनांमुळे इथले भाषावैविध्य, संस्कृतिवैविध्य मोठे आहे. प्रत्येक प्रांताची भाषा वेगळी, संस्कृती वेगळी, उत्सव वेगळे, सण वेगळे, तरीही त्या सर्वांना एकत्रित आणणारी राष्ट्रीयत्वाची भावना आपल्या स्वातंत्र्यलढ्यामुळे निर्माण झाली. सुब्रह्मण्य भारती यांच्यासारख्या राष्ट्रकवीने तमीळमध्ये रचना केल्या. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी 'जयोस्तुते'सारखी रचना संस्कृतप्रचुर मराठीमध्ये केली.

१८५७ च्या स्वातंत्र्यलढ्यात सेनापतिपद भूषवणाऱ्या अझिमुल्लाखान या योद्ध्याचे 'हम हैं इसके मालिक' हे गीतही प्रसिद्ध आहे. अझिमुल्लाखान, स्वातंत्र्यवीर सावरकर, सेनापती बापट, 'सरफरोशी की तमन्ना' हे गीत लिहिणारे पं. रामप्रसाद बिस्मिल यांपासून अगदी साने गुरुजींपर्यंत स्वातंत्र्यलढ्यातील सहभागी नेत्यांनी लिहिलेल्या गीतांना प्रखर देशभक्तीची जोड आहे.

'क्रियेविण वाचाळता व्यर्थ आहे', या उक्तीप्रमाणे या सर्व गीतांना त्यांच्या स्वातंत्र्यलढ्यातील कर्तृत्वाची जोड मिळाल्यामुळे या गीतांना एक वेगळे परिमाण प्राप्त झाले होते.

आजचे भारताचे राष्ट्रगीत 'जन-गण-मन' हे बंगाली भाषेमध्ये आहे आणि स्वातंत्र्यपूर्व काळात जे भारतीय जनतेचे मनोमन राष्ट्रगीत ठरले होते, ते 'वन्दे मातरम्'ही ही संस्कृतप्रचुर बंगालीमध्येच आहे.

भारतातील प्रत्येक प्रांतात त्या प्रांतातील भाषेमध्ये उत्तमोत्तम देशभक्तिपर गीते निर्माण झाली व स्वातंत्र्यसंग्रामात या गीतांनी जनतेला सतत जागते ठेवून स्फूर्ती दिली. तरीही या प्रांतांतील कोणत्याही गीताला किंवा एखाद्या हिंदी राष्ट्रभक्तिपर गीताला राष्ट्रगीताचा मान मिळाला नाही. कदाचित 'वन्दे मातरम्'इतकी लोकप्रियता संपूर्ण देशात दुसऱ्या कुठल्याही गीताला मिळाली नाही, हेही एक कारण असू शकते. 'वन्दे मातरम्'ची भाषा संस्कृतप्रचुर बंगाली असली, तरीही 'वन्दे मातरम्' या दोन शब्दांनी स्वातंत्र्यलढ्यात जी कामगिरी केली, ती पाहता 'वन्दे मातरम्' हे बंगाली गीत आहे, ही बाबही सर्वसामान्य जनतेला महत्त्वाची वाटली नाही.

आजच्या आपल्या 'जन-गण-मन' या राष्ट्रगीताच्या इतिहासाचा विचार करण्यापूर्वी ब्रिटिश येथे आल्यानंतर निर्माण झालेल्या परिस्थितीचा विचार करणे आवश्यक आहे. 'देशाला राष्ट्रगीत हवे', ही विचारधाराच मुळी ब्रिटिशांविरुद्धच्या स्वातंत्र्यलढ्याच्या शेवटच्या ९० वर्षांत, १८५७ नंतरच्या काळात विकसित झाली. परंतु आपल्याकडील राष्ट्रगीत कसे असावे, याविषयीची संकल्पना निश्चित नसल्यामुळे किंवा विचारवंतांनी, स्वातंत्र्यकवींनी यावर कोणतीही जाहीर चर्चा न केल्यामुळे, राष्ट्रगीताचा विषय पूर्णत्वाला कधीच गेला नाही. त्यातच अचानकपणे स्वातंत्र्यप्राप्तीच्या सुमारास 'जन-गण-मन' हे राष्ट्रगीत म्हणून पुढे आणले गेले.

प्रकरण २ :

# भारतातील ब्रिटिश राजवट आणि राष्ट्रगीताची संकल्पना

वैदिक कालखंडानंतर पुढे इसवी सनानंतरच्या पंधराव्या शतकापर्यंत भारतीय वाङ्मयात फारशा राष्ट्रभक्तिपर पद्यरचना झाल्याचे दिसत नाही. देशाला एखादे राष्ट्रगीत असायला हवे, ही कल्पनाच इंग्रजी राजवट इथे स्थिरावल्यानंतरच्या काळात पुढे आली. त्यामुळेच 'राष्ट्र ही संकल्पनाच आपल्याकडे कधीही नव्हती आणि त्यामुळेच या देशाला राष्ट्रगीतही नव्हते' असा प्रवाद आजही आहे.

१९ व्या शतकाच्या सुरुवातीपासूनच पाश्चात्त्य संस्कृतीशी आणि वाङ्मयाशी इथल्या विचारवंतांचा, नवशिक्षितांचा परिचय झाल्यानंतर त्यांना आपल्या देशाचे अनेक गोष्टींमधील मागासलेपण ठळकपणे जाणवू लागले. माणसा-माणसांत भेदाभेद करणारी जीवनप्रणाली, तीव्र स्वरूपाचे जातिभेद, सतीसारख्या अमानवी रूढींचे उदात्तीकरण यांनी आपल्या प्राचीन भारतीय संस्कृतीची परंपरा खंडित केली होती. बंगालमध्ये राजा राममोहन रॉय यांच्यापासून पंडित ईश्वरचंद विद्यासागर तर महाराष्ट्रात महात्मा ज्योतिराव फुले, लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख, गोपाळ गणेश आगरकर यांसारख्या विचारवंतांनी तत्कालीन समाजाचा रोष पत्करून सुधारणेची हाक दिली. स्वत: राजा राममोहन रॉय यांच्यावर पाश्चात्त्य संकल्पनांचा प्रभाव असला, तरी भारतातील सर्व धर्मांचा, धर्मग्रंथांचा त्यांनी अभ्यास केलेला असल्यामुळे भारतीय संस्कृतीचे मोठेपण त्यांनी झिडकारले नव्हते. महात्मा फुले यांच्यासारख्या विचारवंताची विचारप्रणाली मात्र अस्सल मराठी मातीतील आणि स्वतंत्र विचारसरणीची होती. महात्मा फुले यांच्या सर्वच वाङ्मयात त्यांच्या या वृत्तीची ओळख पटते.

मात्र १९ व्या शतकातील या सर्वच आधुनिक विचारवंतांनी राष्ट्रगीत व राष्ट्रध्वज या विषयांवर विचारमंथन वा लेखन केल्याचे दिसत नाही. कदाचित् त्यामुळेच 'राष्ट्रगीत ही संकल्पना आपण पाश्चात्त्यांकडून उचलली,' या तर्काला अप्रत्यक्षरित्या पुष्टी मिळाली.

आधुनिक भारताच्या इतिहासात भारतीय जनतेने उत्स्फूर्तपणे ज्या गीताला राष्ट्रगीताचा मान दिला, ते गीत म्हणजे ऋषी बंकिमचंद्रांचे 'वन्दे मातरम्'! या गीताच्या जन्मापूर्वी ब्रिटिश राज्यकर्त्यांनी ब्रिटिश शासनावरील निष्ठा भारतीयांच्या

गळी उतरविण्यासाठी त्या थाटाचे राष्ट्रगीत इथे रुजवण्याचे जे प्रयत्न केले, ते पाहणेही महत्त्वाचे आहे. भारतीय जनतेला राष्ट्रगीत म्हणजे काय, ते कसे असावे, यांबद्दलच्या कल्पना स्पष्ट झालेल्या नसल्यामुळे ब्रिटिशांच्या प्रयत्नांना काही प्रमाणात यश येऊ लागले.

मुख्य फरक ब्रिटिश आणि भारतीय संस्कृतींमधला आहे.

## राष्ट्रगीत की राजगीत?

ब्रिटिश शासनपद्धतीमध्ये राजघराण्याला प्रथमपासूनच महत्त्व होते. त्यांची राष्ट्रभक्ती ही केवळ त्यांच्या भूमीशी नव्हे, तर राजघराण्याच्या वलयाभोवतीही केंद्रित होती. 'गॉड सेव्ह द किंग' किंवा 'गॉड सेव्ह द क्वीन' ही दोन्हीही गीते याच वृत्तीची द्योतक आहेत.

राजगीत, क्रांतिगीत, ध्वजगीत किंवा देशाची प्रार्थना करणारे गीत असे वेगवेगळे पैलू राष्ट्रगीताच्या संदर्भात असू शकतात. जगातील इतर देशांमधील सध्या प्रचलित असलेली राष्ट्रगीते पाहिली, तर राष्ट्रगीताचे नेमके निकष काय, याचा निश्चित निष्कर्ष काढता येत नाही; कारण प्रत्येक देशाचे राष्ट्रगीत हे तेथील संस्कृती, परंपरा, राजकीय विचारसरणी यांवर अवलंबून असते. यामुळे प्रत्येक देशाच्या राष्ट्रगीताला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे.

ब्रिटिश राजवटीच्या काळात जेव्हा ही संकल्पना पुन्हा भारतीयांमध्ये रुजविण्याचा प्रयत्न होऊ लागला, तेव्हा अर्थातच या कल्पनेवर ब्रिटिश साम्राज्यवादाचीच छाया होती. त्या काळात गायले जाणारे 'गॉड सेव्ह द किंग' हे गीत ध्वजगीत किंवा प्रार्थनागीत या प्रकारात मोडणारे नसून ते केवळ राजप्रशस्तिगीत होते. ब्रिटिश साम्राज्यवादाचा अहंकार त्याच्या प्रत्येक शब्दाशब्दातून डोकावत होता.

## राजकीय परिस्थिती व राष्ट्रगीताची चर्चा

इसवी सन १६०० मध्ये 'ईस्ट इंडिया कंपनी' स्थापन होऊन व्यापारी म्हणून इंग्रज येथे आले. व्यापाराच्या निमित्ताने मोठमोठ्या वखारी बांधून त्यांच्या संरक्षणासाठी ब्रिटिश सैन्य येथे आले. हळूहळू इथल्या राजकारणात त्यांनी शिरकाव सुरू केला. छत्रपती शिवराय पन्हाळ्याच्या वेढ्यात असताना सिद्दी जौहरला ब्रिटिश फौजेने तोफा पुरवल्या होत्या. त्यावर वेढ्यातून सुटल्यावर शिवरायांनी त्यांना शासनही फर्मावले होते. ब्रिटिशांची ही पावले येथील काही राज्यकर्त्यांनी ओळखली.

१७५७ मध्ये इंग्रजांनी बंगालप्रांत ताब्यात घेतला व हळूहळू पुढच्या शंभर वर्षांत बहुतांश भारत आपल्या अमलाखाली आणला. १८५७ च्या स्वातंत्र्यसमराने इंग्रजांविरुद्ध प्रथम मोठे युद्ध उभे राहिले. अनेक योद्ध्यांनी पराक्रमाची शर्थ करूनही हा लढा यशस्वी झाला नाही.



कलकत्ता बंदरात इंग्रजांची व्यापारी जहाजे.

१८५७ च्या स्वातंत्र्यलढ्यानंतर व्हिक्टोरिया राणीने जाहीरनामा काढून लोकक्षोभ कमी करण्याचा प्रयत्न केला. १८७७ पासून भारतीय लोक राणी व्हिक्टोरियाच्या साम्राज्याचे अविभाज्य घटक बनले.

इंग्लंडमध्ये केवळ एकाच व्हिक्टोरिया राणीचे राज्य होते. भारतात मात्र असंख्य लहान-मोठी संस्थाने व राजेराजवाडे होते, राजघराणी होती. ती मर्यादित भूभागावर राज्य करत असली, तरी जनतेवर त्यांची बऱ्यापैकी पकड होती.

भारतीय जनतेचे कल्याण केवळ ब्रिटिश सत्ताच करू शकेल, हे ठसवण्याचे प्रयत्न राज्यबळाच्या जोरावर ब्रिटिश सरकार करत होते, तरी हे यश मर्यादित स्वरूपाचेच होते. सर्वसामान्य जनता अजूनही आपल्याला स्वीकारत नाही, हे लक्षात आल्यावर त्यांनी अन्य उपाययोजनांची चाचपणी सुरू केली. मेकॉलेप्रणीत शिक्षणपद्धती हा त्यातला महत्त्वाचा भाग होता. अशा शिक्षणपद्धतीतील क्रमिक पुस्तकांमध्ये प्रादेशिक भाषांमध्ये राजप्रशस्तिगीते अंतर्भूत करण्यास सुरुवात झाली. शिक्षणपद्धतीतून व इतर सार्वजनिक कार्यक्रमांतून 'गॉड सेव्ह द किंग' हे गीत गळी उतरवण्याचा प्रयत्न होऊ लागला. याचे सर्वांत उत्तम उदाहरण म्हणजे ब्रिटिश सरकारला सनदशीर मार्गाने विरोध करण्याच्या हेतूने स्थापन झालेल्या राष्ट्रीय सभेच्या मुंबई इथे झालेल्या पहिल्या अधिवेशनातसुद्धा 'गॉड सेव्ह द किंग'चे गायन झाल्याचे उल्लेख मिळतात. कदाचित राष्ट्रीय सभेच्या स्थापनेत सहभागी असलेल्या 'ॲलन ह्यूम'सारख्या ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या सहभागाचा हा परिणाम असेल.

ब्रिटिश राष्ट्रगीत येथील लोकांच्या मनात ठसवण्यासाठी ब्रिटिशांनी काही योजना आखल्या. या योजनांत याविषयी चर्चा केली व त्याचे फायदेही नोंदविले गेले.

राजभक्ती व्यक्त करण्याचे माध्यम प्रजाजनांना देणे, एकेश्वरवादाशी जवळीक साधणारे व एकाच सामर्थ्यशाली शक्तीला उद्देशून केलेले गीत प्रसृत करणे अशा अनेक योजनांचा विचार झाला होता. ब्रिटिशांच्या या प्रयत्नांना मिळालेला प्रतिसाद संमिश्र स्वरूपाचा होता. हे गीत जरी ब्रिटिशांच्या राजा-राणीचे गुणगान गाणारे असले, तरी त्या गीताची संगीतरचना भारतीय असायला हवी, तरच भारतीय लोक ते स्वीकारतील, हे लक्षात घेऊन ब्रिटिशांनी ही कामगिरी सौरिंद्रमोहन ठाकूर (टागोर) यांच्यावर १८८० मध्ये सोपवली.

कलकत्त्यातील जोडा साँको ठाकूर व पाथुरिया घाट ठाकूर अशी दोन घराणी प्रसिद्ध होती. रवीन्द्रनाथ हे जोडा साँको घराण्याचे वंशज; तर सौरिंद्रमोहन हे पाथुरिया घाट ठाकुरांचे वंशज. सौरिंद्रमोहन हे भारतीय संगीतामध्ये वेगवेगळे प्रयोग करून त्यावर लिहिणारे आधुनिक काळातील आद्य भारतीय संगीततज्ज्ञ होते. आपले संपूर्ण आयुष्य त्यांनी संगीतासाठीच वाहून घेतले होते. त्यातही पाश्चिमात्य संगीतापेक्षा शास्त्रीय संगीताचे वेगळेपण, त्यातली शास्त्रशुद्धता व श्रेष्ठत्व ते आपल्या सांगीतिक कामगिरीतून ब्रिटिशांना पटवून देत होते. ब्रिटिश राजवटीला ते मानणारे असल्यामुळे राज्यकर्त्यांनी राणीच्या प्रशंसागीताची संगीतरचना करण्याचे काम त्यांच्यावर सोपवले. १८८२ मध्ये त्यांनी या गीताच्या १२ वेगवेगळ्या संगीतरचना केल्या. त्या प्रामुख्याने भारतीय रागदारीवर आधारित होत्या. हे राजप्रशंसागीत ब्रिटिशांचे राष्ट्रगीतच होते व ब्रिटिश अंमलाखाली असलेल्या सर्वसामान्य भारतीय लोकांना गाता येईल तसेच राष्ट्रगीताचे गांभीर्य त्यामध्ये असेल या बाबींचा विचार त्यांनी केला होता.

एकीकडे पाथुरिया घाटच्या ठाकुरांपैकी सौरिंद्रमोहन राष्ट्रगीताच्या संगीतरचना रचण्यात गुंतलेले असताना दुसरीकडे जोडा साँको ठाकूर घराण्यातील एक तरुण कोवळा युवक कवितेच्या वेगवेगळ्या भावावस्था रेखाटत होता. प्रचंड मोठ्या हवेलीच्या चार भिंतींच्या आत गेलेले बालपण संपवून त्याचे वडील त्याला बाहेरच्या मोकळ्या वातावरणात, निसर्गाच्या सान्निध्यात वेगवेगळे अनुभव देत होते आणि त्यातूनच एका महाकवीचे, एका विश्वकवीचे व्यक्तिमत्त्व घडत होते.

तो युवक होता महर्षी देवेंद्रनाथ ठाकुरांचा सर्वांत धाकटा मुलगा रवीन्द्रनाथ!

प्रकरण ३ :



# रवीन्द्रनाथ

जगातील कोणतीही व्यक्ती ही सर्वगुणसंपन्न किंवा सर्व कला जाणणारी असू शकत नाही आणि तशी ती असेल, तर तिला पूर्णपुरुष म्हटले पाहिजे, पण तरीही जास्तीत जास्त कलागुण ज्यांच्या अंगी आहेत, ज्यांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेकविध पैलू आहेत, अशी काही मोजकी व्यक्तिमत्त्वे जगाच्या इतिहासात आढळतात.

लिओनार्दो-दा-विन्सी हा प्रसिद्ध चित्रकार त्यांपैकीच एक. चित्रकलेच्या क्षेत्रात क्रांती घडवणाऱ्या 'मोनालिसा' या चित्राचा जनक एवढीच त्याची ओळख पुरेशी नाही. तो उत्तम चित्रकार, शिल्पकार तर होताच; पण त्याचबरोबर तो उत्तम वास्तुरचनाकारही होता. संगीताचेही त्याचे ज्ञान चांगले होते. त्याने केलेल्या रेखाटनांवरून अनेक वाद्यांची निर्मिती झाली आहे. विमानाशी साधर्म्य असणाऱ्या व आकाशात उडू शकणाऱ्या उपकरणाचे रेखाटनही त्याने केले होते. युद्धशास्त्राचा तो जाणकार होता. चित्रकलेच्या आणि शिल्पकलेच्या आविष्काराला परिपूर्णता यावी यासाठी शरीरशास्त्राचाही त्याने अभ्यास केला होता.

भारतात असे व्यक्तिमत्त्व शोधायचे असेल, तर त्यात पहिले नाव केवळ रवीन्द्रनाथ ठाकुरांचेच घेता येईल. रवीन्द्रनाथ आणि 'जन-गण-मन' यांचा अतूट संबंध आहे. परंतु 'जन-गण-मन'चा विचार करण्यापूर्वी रवीन्द्रनाथांच्या व्यक्तिमत्त्वाची जडण-घडण व कौटुंबिक, सामाजिक पार्श्वभूमी लक्षात घेतली पाहिजे.

त्यांच्या 'गीतांजली' या काव्याला मिळालेल्या 'नोबेल' पुरस्कारामुळे भारतीय कवितेला अर्थातच भारतीय साहित्याला जागतिक साहित्यात मानाचे स्थान मिळाले. ते उत्तम कथाकार होते, कादंबरीकार होते, नाटककार होते, अभिनेते होते. संगीतातील त्यांचे कौशल्य अतुलनीय होते. परदेशांतील वास्तव्याच्या काळात पाश्चात्त्य संगीताचा अभ्यास त्यांनी जरूर केला, पण त्याच्या प्रभावाखाली न येता स्वतंत्र संगीतनिर्मिती करून 'रवींद्रसंगीता'च्या रूपात त्यांनी भारतीय संगीताला एक वेगळे परिमाण मिळवून दिले. 'रवींद्रसंगीता'तील गोडवा, माधुर्य, कारुण्य, सहजता यांची जादू आज इतक्या वर्षांनंतरही कायम आहे. रवीन्द्रनाथांचे फारसे शिक्षण शाळा-कॉलेजमध्ये जाऊन झाले नाही. त्या औपचारिक शिक्षणापेक्षा वडलांमुळे अनेक कलाशाखांतील



रवीन्द्रनाथांचे आजोबा
राजा द्वारकानाथ ठाकूर.



रवीन्द्रनाथांचे वडील
महर्षी देवेन्द्रनाथ ठाकूर.

विद्वानांकडून दिल्या गेलेल्या अनौपचारिक शिक्षणाचाच प्रभाव रवीन्द्रनाथांवर अधिक झाला. 'शांतिनिकेतन'सारखा शिक्षणक्षेत्रातील एक वेगळा धाडसी प्रयोग त्यांनी यशस्वी करून दाखवला. मेकॉलेप्रणीत इंग्रजी शिक्षणपद्धतीला केवळ नावे ठेवण्यापेक्षा इथल्या प्राचीन गुरुकुल परंपरेशी नाते सांगणारी शिक्षणपद्धती त्यांनी निर्माण केली आणि या शिक्षणपद्धतीत मुक्त कलाविष्काराला त्यांनी महत्त्वाचे स्थान दिले.

वयाच्या साठीनंतर त्यांच्यातला चित्रकार जागा झाला. शब्दांना रेषांचे आकार मिळाले. त्यांना नवे नवे रंग प्राप्त झाले. त्यांची चित्रकारिताही पारंपरिक चित्रकलेपेक्षा वेगळ्या वळणाने जाणारी होती. चुलतभाऊ अवनीन्द्रनाथ, गगनेन्द्रनाथ, नंदलाल बोस यांनी भारतीय चित्रकलेचे पुनरुज्जीवन ह्याच शांतिनिकेतनमध्ये केले. रवीन्द्रनाथांचा भर मात्र उत्स्फूर्ततेकडे होता.

संगीत, नृत्य, नाट्य, चित्र आणि वाङ्मय यांतील सर्व प्रकार या विश्वकवीने यशस्वीपणे हाताळले. या कलानिपुण व्यक्तिमत्त्वाला स्वाभिमानाची जोड होती म्हणूनच ब्रिटिश राजघराण्याने दिलेला 'सर' हा सर्वोच्च किताब जालियाँवालाबाग हत्याकांडानंतर एका उद्विग्न मन:स्थितीत त्यांनी सरकारला परत केला.

आज राष्ट्रगीत असणाऱ्या 'जन-गण-मन'चे कवी अशी रवीन्द्रनाथांची ओळख करून घेणे म्हणजे त्यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वावर अन्याय करण्यासारखेच आहे. रवीन्द्रनाथांनी भारतासाठी राष्ट्रगीत लिहायचे असे ठरवून 'जन-गण-मन'ची निर्मिती केलेली नव्हती. स्वातंत्र्याची पहिली पहाट उजाडण्याच्या सहा वर्षे आधी रवीन्द्रनाथांचे निधन झाले होते. रूढार्थाने रवीन्द्रनाथ संपन्न कलापूर्ण असे दीर्घायुष्य जगले. 'जन-गण-मन'सारखी इतरही अनेक देशभक्तिपर गीते त्यांनी केली. 'भारततीर्थ', 'अयि



रवीन्द्रनाथांचे वडील देवेन्द्रनाथ ठाकूर.



रवीन्द्रनाथांच्या माता शारदादेवी.

भुवन मन मोहिनी' यांसारखी नितांतसुंदर गीते त्यांनी लिहिली, पण 'जन-गण-मन'ची निर्मिती मात्र एका मनक्षोभक परिस्थितीतून झाली आणि त्यानंतरही या गीताच्या अनुषंगाने त्यांच्या हितशत्रूंनी, टीकाकारांनी केलेल्या आरोपांमुळे त्यांना भरपूर मनस्ताप झाला होता. 'जन-गण-मन' हे गीत लिहिले, त्यावेळी रवीन्द्रनाथांचे वय पन्नास वर्षांचे होते. साहजिकच त्यांची कविता एक प्रकारे परिपक्व झालेली होती.

रवीन्द्रांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडण-घडणीत त्यांच्या कुटुंबातील व्यक्तींचा मोठा वाटा होता. रवीन्द्रनाथांचे आजोबा द्वारकानाथ ठाकूर (१७९४-१८४६) हे कलकत्त्यातील श्रीमंत आणि प्रतिष्ठित व्यक्तिमत्त्व होते. 'राजा' या उपाधीने त्यांना गौरवले होते. राजा राममोहन रॉय यांच्या सतीविरोधी मोहिमेत त्यांनी त्यांना मदत केली होती. १८२४ मध्ये केलेला प्रेस ॲक्ट या 'काळा कायदा' म्हणून ओळखला जाणाऱ्या कायद्याविरुद्ध बंगालमध्ये जी चळवळ झाली त्यातही राजा द्वारकानाथ अग्रभागी होते. 'इंडियन बँक', 'युनियन बँक', 'हिंदू कॉलेज', 'मेडिकल कॉलेज' अशा अनेक मोठ्या संस्थांचा पाया त्यांनी घातला.

रवीन्द्रनाथांचे वडील देवेन्द्रनाथ हे द्वारकानाथांचे थोरले चिरंजीव. द्वारकानाथांच्या मृत्यूच्या वेळी धंद्यात आलेल्या नुकसानीमुळे त्यांना झालेले प्रचंड कर्ज देवेन्द्रनाथांनी पुढे सचोटीने फेडले. त्यामुळेच देवेन्द्रनाथांच्या वेळी वैभव कमी झाले, तरी घराण्याची प्रतिष्ठा मात्र अधिकच वाढली. रवीन्द्रनाथांच्या जन्मानंतर देवेन्द्रनाथ अध्यात्ममार्गाकडे वळले होते. प्रापंचिक जीवनाचा त्यांनी त्याग केला नाही, तरी काहीशा अलिप्तपणे ते संसारात वावरत होते. आपल्या थोरल्या मुलावर संसाराचा भार टाकून ते एखाद्या ऋषीप्रमाणे आपले आयुष्य जगत होते. त्यामुळेच त्यांना 'महर्षी' या नावाने लोक



कलकत्ता येथील जोडा साँको हे ठाकुरांचे निवासस्थान.

संबोधू लागले.

रवीन्द्रनाथांचे बालपण त्यांच्या भल्यामोठ्या हवेलीतच गेले. आज या हवेलीमध्ये विद्यापीठ सुरू झाले असले, तरी रवीन्द्रनाथांच्या काळातही ते खरेखुरे विद्यापीठच होते. कलकत्त्यातील नामवंत गायक, वादक, लोकसंगीतातील कलाकार, लेखक, तत्त्वज्ञ या सर्वांचे या वाड्यात कायमच येणे-जाणे असे. रवीन्द्रनाथांच्या भल्यामोठ्या कुटुंबातल्या सर्व मुलांचे शिक्षण या हवेलीतच झाले. संगीत, नृत्य, नाट्य या सर्व कलांचे संस्कार अगदी लहानपणी घरातच झाल्यामुळे रवीन्द्रनाथांचे पुढचे कलाजीवन सर्वार्थाने बहरले.

‘अभिलाषा’ ही रवीन्द्रनाथांची सर्वप्रथम प्रकाशित झालेली कविता, वयाच्या अवघ्या १३ व्या वर्षी नाव न देता ‘तत्त्वबोधिनी पत्रिका’ या अंकात नोव्हेंबर-डिसेंबर १८७४ मध्ये प्रकाशित झाली. याच सुमारास हिंदू मेळ्यामध्ये त्यांनी जाहीरपणे गायलेली भारतावरची कविताही त्यांच्या नावाने प्रकाशित झाली. १८८५ मध्ये स्थापन झालेल्या ‘इंडियन नॅशनल काँग्रेस’चे पूर्वरूप म्हणता येईल, अशीच ‘हिंदू मेळा’ ही संस्था होती. रवीन्द्रनाथांचे थोरले बंधू सत्येन्द्रनाथ हेही उत्तम कवी होते. सर्वांत थोरले बंधू द्विजेन्द्रनाथ यांनीही एका महाकाव्याची रचना केली होती. घरात संस्कृत आणि इंग्रजी वाङ्मयही होते. कालिदास, भास, भवभूती, बाण यांच्याबरोबर ते शेक्सपिअरलाही भेटू लागले.

मध्यंतरीच्या काळात रवीन्द्रनाथ परदेशवारीही करून आले. इथे परत आल्यानंतर ते पुन्हा आपल्या कलासाधनेत मग्न झाले. ‘वाल्मिकी’ हे नाटक त्यांनी लिहिले आणि त्यात वाल्मिकीची भूमिकाही केली. आपली स्वत:ची गीते ते जाहीर कार्यक्रमामध्ये स्वत:च गाऊ लागले.

रवीन्द्रनाथांच्या गद्य लेखनासही याच काळात सुरुवात झाली. तो काळ बंकिमचंद्रांच्या कादंबरीलेखनाने भारून टाकलेला होता. आधुनिक भारतीय साहित्याला आपल्या कादंबरीलेखनाने बंकिमचंद्रांनी एक नवी दिशा दाखवली. तो काळच 'बंकिमयुग' म्हणून बंगाली साहित्यात गौरवला जातो. साहजिकच रवीन्द्रनाथांच्या लेखनावरही बंकिमचंद्रांचा प्रभाव काही काळ होता. परंतु प्रचंड प्रतिभाशक्तीमुळे या प्रभावातून ते लवकरच बाहेर पडले.

रवीन्द्रनाथांचे लेखन चालू असतानाच वडील देवेन्द्रनाथांनी त्यांच्यावर जमीनदारीची काही जबाबदारी टाकली. रवीन्द्रनाथांचे या काळातले जीवन हे अनेक चमत्कृतिपूर्ण प्रसंगांनी भरलेले आहे. तरुणपणात प्रवेश करताना त्यांनी वडलांबरोबर हिमालयभ्रमण केले. पाठोपाठ बंधू सत्येंद्रनाथ यांच्याबरोबर परदेशभ्रमणही केले.

जमीनदारीच्या निमित्ताने गंगेच्या प्रवाहात स्वत:च्या नौकेतून केलेल्या विपुल प्रवासाच्या निमित्ताने त्यांचे विविध ठिकाणी वास्तव्य झाले. या काळातच त्यांच्या चिंतनशील स्वभावामुळे व चांगले ते टिपून घेण्याच्या वृत्तीमुळे त्यांच्यातील कलाकार घडत होता.

जोडा साँको येथे हवेलीच्या भिंतींच्या आत, हवेलीच्या आवारात झालेले संस्कार आणि आता देश-विदेश भ्रमणानंतर आलेली परिपक्वता रवीन्द्रनाथांच्या साहित्यातून प्रकट होऊ लागली.

रवीन्द्रनाथ स्वत: कविवृत्तीचे असले, कलाकार असले, तरी ते केवळ आत्ममग्न नव्हते. आजूबाजूच्या परिस्थितीचा त्यांच्या मनावर परिणाम होतच होता. त्यांचे ठाकूर घराणे इंग्रजांशी जवळीक साधलेले असले, तरीही इंग्रजी राजवटीचा खोटा अभिमान त्यांना नव्हता. बंकिमचंद्र, मायकेल मधुसूदन दत्त हे स्वत: सक्रिय राजकारणात कधीही शिरले नाहीत. बंकिमचंद्रांनी स्वातंत्र्यलढ्याला प्रेरक ठरणाऱ्या साहित्याची निर्मिती केली. 'वन्दे मातरम्'च्या रूपाने स्वातंत्र्यलढ्याला रणघोष दिला. 'आनंदमठ' कादंबरीने अनेकांच्या मनात क्रांतीची भावना रुजवली. या दोघांनी ज्याप्रमाणे स्वत:ला सक्रिय राजकारणापासून दूर ठेवले, तसे रवीन्द्रनाथ मात्र स्वत:ला दूर ठेवू शकले नाहीत. स्वत:च्या संवेदनशील स्वभावामुळे ते स्वातंत्र्यलढ्याशी आपोआप जोडले गेले. त्यातील अनेक प्रसंगांत त्यांनी स्वत:ला झोकून दिले आणि योग्य वेळ येताच ते त्यातून अलिप्तपणे दूरही झाले. लोकमान्य टिळकांपासून अरविंद घोष आणि नंतरच्या काळात महात्माजींशीही त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. वडील महर्षी देवेन्द्रनाथांच्या स्वभावातील ऋषींप्रमाणे अलिप्तता हा स्वभावधर्म रवीन्द्रनाथांनी राजकारणात दाखवला. त्यामुळे रवीन्द्रनाथांवर केवळ राजकीय नेते किंवा स्वातंत्र्यलढ्यातील अग्रणी असा शिक्का बसला नाही. तरीही राजकारणात मुख्यत: स्वातंत्र्यलढ्यासाठी त्यांनी दिलेले योगदान खचितच कमी नाही.

## रवीन्द्रनाथांचे स्वातंत्र्यलढ्यातील योगदान

'जन-गण-मन' या गीतलेखनाच्या निमित्ताने या गीतावर व स्वत: रवीन्द्रनाथांवर सर्वांत मोठा घेतलेला आक्षेप म्हणजे त्यांच्या देशभक्तीबद्दल घेतलेली शंका. याविषयी पुढे सविस्तर येणारच आहे. परंतु मुळात अशी शंकाच का यावी? 'जन-गण-मन'च्या लिखाणापूर्वी रवीन्द्रनाथांनी केलेली स्वातंत्र्यलढ्यातील कामगिरी नजरेआड का करण्यात आली, असे अनेक प्रश्न आहेत.

असा आक्षेप घेणाऱ्या टीकाकारांना प्रामुख्याने ठाकूर घराण्याचे इंग्रजी राजसत्तेशी असलेले मानाचे संबंध दिसले असावे. इ.स. १९११ पर्यंत म्हणजे 'जन-गण-मन'च्या लेखनापर्यंत कलकत्ता हीच भारताची राजधानी होती. इंग्रजांनी भारतातील आपली सत्ता सर्वप्रथम कलकत्त्यातच स्थापन केली. १९११ नंतर ही राजधानी दिल्लीला हलवण्यात आली. साहजिकच कलकत्त्यात प्रिन्स द्वारकानाथ ठाकूर यांच्यापासून घराण्याला असलेल्या प्रतिष्ठेमुळे अनेक मोठ्या समारंभांना ठाकूर घराण्यातील लोकांना मानाचे आमंत्रण असे.

ब्रिटिश दरबारी वावरताना रवीन्द्रनाथांनी किंवा ठाकूर घराण्याने कधीही स्वाभिमान सोडला नाही किंवा तत्कालीन संस्थानिक, सरदारांप्रमाणे लाचारीचे प्रदर्शन केले नाही. ठाकूर घराणे हे पिढीजात श्रीमंत तर होतेच; पण एक सुसंस्कृत, विद्वान, विद्याप्रेमी, सामाजिक चळवळींमध्ये अग्रक्रमाने भाग घेणारे असे हे घराणे होते. त्याहीपेक्षा त्यांच्या घराण्यातील व्यक्तींनी चित्रकला, संगीत, नाट्य आणि लेखन या कलाक्षेत्रांत मिळवलेल्या उत्तुंग यशामध्ये ठाकूर घराण्याचे वेगळेपण होते. एक कलाकार घराणे म्हणून रवीन्द्रनाथांना सरकारदरबारी मानाचे स्थान होते. १९०७-०८ नंतर रवीन्द्रनाथ सक्रिय राजकारणापासून दूर झालेले असले, तरी संपूर्ण देशाच्या स्वातंत्र्यलढ्याला कलाटणी देणाऱ्या वंगभंगविरोधी आंदोलनाचे नेतृत्व सुरुवातीला रवीन्द्रनाथांनीच केले होते. त्या आंदोलनाच्या सुरुवातीला त्यांनी केलेल्या दोन महत्त्वाच्या गीतरचना पाहिल्या, त्यांतील उत्स्फूर्त देशभक्ती पाहिली, तर 'जन-गण-मन'वर लावलेल्या राजप्रशस्तीच्या आरोपाची धार आपोआप कमी होईल.

वंगभंगविरोधी आंदोलनात रवीन्द्रनाथांनी घेतलेला पुढाकार ही कर्झनच्या दडपशाही वृत्तीच्या निषेधार्थ दिलेली तीव्र प्रतिक्रिया होती; परंतु ही रवीन्द्रनाथांची प्रतिक्रिया आकस्मिक नव्हती किंवा केवळ बंगाली अस्मिता उराशी धरून अचानकपणे आलेला प्रांतिक उमाळाही नव्हता. त्याहीपूर्वी जवळ जवळ २०-२२ वर्षे रवीन्द्रनाथ राष्ट्रीय वृत्ती जागवणाऱ्या कार्यक्रमांमध्ये, चळवळींमध्ये सहभागी होते. १८८५ मध्ये मुंबईमध्ये 'राष्ट्रीय सभे'ची स्थापना झाली आणि इंग्रजी राजवटीला सनदशीर मार्गाने विरोध करण्याचा एक मार्ग खुला झाला.

मुंबईपाठोपाठ कलकत्त्यालाही राष्ट्रीय चळवळ जोर धरत होती. मुंबईच्या पहिल्या




बंगालमध्ये लोकमान्य टिळकांच्या बचावासाठी जनमत तयार करणारे 'अमृतबझार पत्रिके'चे शिशिरकुमार घोष व मतिलाल घोष.

अधिवेशनाचे अध्यक्ष व्योमेशचंद्र बॅनर्जी हे देशभक्त बंगालीच होते. त्यामुळे साहजिकच राष्ट्रीय सभेचे दुसरे अधिवेशन १८८६ मध्ये कलकत्त्यातच झाले. कलकत्त्यातील या पहिल्याच अधिवेशनात रवीन्द्रनाथांनी स्वत: गायलेली 'अमरा मिले छे आज मायेर डाके' ही कविता विशेष गाजली होती. त्यानंतर १८९६ मध्ये झालेल्या कलकत्त्याच्या अधिवेशनात रवीन्द्रनाथांनी त्यांच्या अनेक रचना निर्भयपणे सादर केल्या होत्या. सरकारच्या रोषाची किंचितही भीती न बाळगता रवीन्द्रनाथ राष्ट्रीय सभेसारख्या कार्यक्रमात तितक्याच निर्भयपणे सहभागी होऊन आपल्या देशभक्तिपर रचनांचे सादरीकरण करीत होते.

१८९७ मध्ये लोकमान्य टिळकांवर राजद्रोहाचा पहिला खटला भरला गेला. तेव्हा बंगालमध्ये रवीन्द्रनाथांनी टिळकांच्या बचावासाठी पुढाकार घेतला. शिशिरकुमार आणि मतिलाल घोष यांच्या नेतृत्वाखाली टिळक बचाव निधी उभारण्यासाठी 'अमृतबझारपत्रिके'च्या कार्यालयात जी पहिली सभा झाली, त्यास रवीन्द्रनाथ उपस्थित होते व निधी उभारण्यातही त्यांनी पुढाकार घेतला होता. लोकमान्य टिळकांना १८ महिन्यांची शिक्षा झाली. लोकांमध्ये या निकालाविरुद्ध असंतोषाची लाट उसळली. हा विरोध मोडून काढण्यासाठी सरकारने जे 'सेडिशन बिल' १८९८ मध्ये तयार केले, त्या विरोधात जाहीर सभांमधून निषेध व्यक्त होऊ लागला. कलकत्त्यातील एका सभेत याच संदर्भात रवीन्द्रनाथांनी 'कण्ठरोध' या नावाचा जहाल लेख वाचून दाखविला.

## स्वदेशी चळवळ

लोकमान्य टिळकांनी सांगितलेली चतु:सूत्री प्रसिद्ध आहे. पुढच्या काळात महात्मा गांधींनी स्वदेशीचा आग्रह धरून सामान्य लोकांच्या मनात स्वदेशी वस्तूंचे प्रेम रुजवले; पण त्यापूर्वी महाराष्ट्राप्रमाणे बंगालमध्ये त्याची सुरुवात करणाऱ्यांमध्ये



बंगालची फाळणी!

रवीन्द्रनाथ प्रमुख होते. कलकत्त्यात त्यांनी आपल्या पुतण्याबरोबर 'स्वदेशी वस्तुभांडा उघडले. सार्वजनिक सभासमारंभांत इंग्रजीऐवजी बंगाली भाषेचा आग्रह धरला.

१८९८ सालच्या कलकत्त्याच्या प्लेगच्या साथीमध्ये विलक्षण घाबरलेल् लोकांच्या मदतीला स्वामी विवेकानंदांच्या शिष्या भगिनी निवेदिता धावल्या. त्यांच् बरोबरीने रवीन्द्रनाथही या कार्यात सामील झाले. जगदीशचंद्र बोसांसारख्या वैज्ञानिकांच् अडचणीच्या प्रसंगी रवीन्द्रनाथ त्यांच्या पाठीशी उभे राहिले.

रवीन्द्रनाथ एक कलाकार आणि कवी असले, तरी केवळ स्वप्नसृष्टीत बुड जाणाऱ्यांपेक्षा वास्तवाचे भान त्यांना अतिशय उत्तम होते. त्यामुळेच देशातल्या सामाजिक उत्थानामध्ये त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावली, परंतु १९०५ मध इंग्रजांनी घेतलेल्या बंगालच्या फाळणीच्या निर्णयामुळे रवीन्द्रनाथांचे भावविश्व ढव निघाले आणि बंगालच्या फाळणीविरुद्ध सुरू झालेल्या आंदोलनात त्यांनी अभावितप स्वत:ला झोकून दिले.

## बंगालची फाळणी आणि रवीन्द्रनाथ

१८९९ मध्ये व्हॉइसरॉय म्हणून लॉर्ड कर्झनची नेमणूक झाली आणि अ राष्ट्राचा स्वाभिमान, संस्कृती नष्ट करण्यासाठी या नूतन व्हॉइसरॉयने एका विषवृक्षा आधार घेतला. ज्या हिंदू-मुसलमान एकीचे अभूतपूर्व दर्शन १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्ध इंग्रजांना झाले होते, त्याचा धसकाच कदाचित त्यांनी घेतला होता. 'फोडा आ झोडा' या धोरणाचा अवलंब करून हिंदू आणि मुसलमान यांच्यामध्ये तेढ निर्मा

# Proclamation.

Whereas the Government has thought fit to effectuate the Partition of Bengal in spite of the universal protest of the Bengali nation, we hereby pledge and proclaim that we as a people shall do everything in our power to counteract the evil effects of the dismemberment of our Province and to maintain the integrity of our race. So help us God.

Dated this First day of November
in the year Nineteen Hundred
and Five and given under




बंगालच्या फाळणीचा जाहीरनामा.

करण्याच्या हेतूने इंग्रजांची हालचाल सुरू झाली. उघडपणे असे काही करता येणे शक्य नव्हते. त्यामुळे अशा वेळी हिंदू आणि मुसलमानांची संमिश्र वस्ती असलेल्या बंगालची राज्यकारभाराच्या सोयीसाठी दोन भागांमध्ये विभागणी करण्याची योजना तयार केली गेली. २० जून १९०५ या दिवशी बंगालच्या फाळणीची घोषणा झाली. १६ ऑक्टोबर १९०५ हा दिवस नवीन प्रांताच्या स्थापनेसाठी कर्झनने जाहीर केला.

७ ऑगस्ट १९०५ या दिवशी कलकत्त्याच्या टाऊन हॉलमध्ये याविरुद्ध एका सभेचे आयोजन झाले. परंतु प्रचंड प्रतिसादामुळे टाऊन हॉलमध्ये दोन व बाहेरच्या मैदानात दोन अशा एकाच वेळी चार सभा घेतल्या गेल्या. कासीम बझारचे महाराज, भूपेंद्रनाथ बोस, अंबिकाचरण मजुमदार, सुरेंद्रनाथ बॅनर्जी हे त्या चार सभांचे अध्यक्ष

रवीन्द्रनाथांच्या हस्ताक्षरातील 'बाँगलार माटी' हे गीत

होते. या सभेत स्वदेशीची शपथ घेण्यात आली व फाळणीचा निषेध केला गेला. या सभेत 'वन्दे मातरम्' या शब्दांना प्रथमच रणघोषाचे स्वरूप प्राप्त झाले. या ऐतिहासि सभेनंतर फाळणीविरुद्ध देशभर संतापाची लाट उसळली. या फाळणीविरुद्ध बंगालम जे आंदोलन उभे राहिले, त्याला संपूर्ण देशातील जनतेने पाठिंबा दिला. वंगभंगविरो आंदोलन हे केवळ बंगालचे न रहाता संपूर्ण देशव्यापी आंदोलन झाले.

ज्या दिवशी फाळणीची अंमलबजावणी सुरू होणार होती, त्याच दिवशी ऑक्टोबरला लोकांनी संघटितपणे आपला विरोध दाखवण्याचे ठरवले. त्यादिव सर्वांनी उपोषण करावयाचे आणि गंगेवर स्नानास जाऊन एकमेकांना बंधुभावा प्रतीक म्हणून राखी बांधावयाची, असेही ठरले.

१६ ऑक्टोबर १९०५ चा दिवस उजाडला. हजारो लोक गंगेच्या प्रसन्नकु ठाकूर घाटावर स्नान करून एकमेकांना राखी बांधू लागले आणि म्हणू लागले,

**'सात कोटी लोकेर करुण क्रन्दन । सुने ना सुनिल कुर्ज्जन दुर्ज्जन ।**
**ताइ निते प्रतिशोध मनेर मतन । करिलाम राखी बंधन ।**
**नगरे नगरे ज्वाला रे आगुन । हदये हदये प्रतिज्ञा दारूण ।**
**विदेशी वाणिज्ये कर पदाघात । मायेर दुर्दशा घुचाबे भाई ।'**

'**अर्थ :** सात कोटी लोकांचे करुण रुदन ऐकूनसुद्धा या दुर्जन कर्झनने लक्ष दिले नाही म्हणून त्याचा सूड घेण्यासाठी आम्ही राखीबंधनाचे व्रत घेत आहोत. नगरा–नगरांमध्ये जागृती निर्माण करत आपण प्रतिज्ञा करू या, की विदेशी व्यापारी सत्तेला लाथाडून मातृभूमीची दुर्दशा आपण दूर करू.'

'वन्दे मातरम्'चा जयघोष करीत प्रचंड मोठा जनसमुदाय बिडन स्क्वेअरच्या दिशेने निघाला. रवीन्द्रनाथ या जनसमुदायाच्या पुढेच होते आणि इथेच वंगभंगविरोधी आंदोलनातील एक मोठी सभा भरली. या सभेत रवीन्द्रनाथांनी एक नवे गीत दिले. अतिशय सोप्या शब्दांमध्ये लिहिलेले हे गीत प्रार्थनेच्या स्वरूपात गायले होते.

**बांगलार माटि, बांगलार जल, बांगलार वायु, बांगलार फल**
**पुण्य होउक, पुण्य होउक, पुण्य होउक, हे भगवान ।।**
**बांगलार घर, बांगलार माठ, बांगलार बन, बांगलार हाट,**
**पुण्य होउक, पुण्य होउक, पुण्य होउक, हे भगवान ।।**
**बांगलीर पण, बांगलीर आशा, बांगलीर काज, बांगलीर भाषा**
**पुण्य होउक, पुण्य होउक, पुण्य होउक, हे भगवान ।।**
**बांगलीर प्राण, बांगलीर मन, बांगलीर घरे जत भाई बोन**
**पुण्य होउक, पुण्य होउक, पुण्य होउक, हे भगवान ।।**

प्रचंड मोठी मिरवणूक सभास्थानी आली आणि रवीन्द्रनाथांनी स्वत:च्या पहाडी आवाजात आव्हानगीत गायला सुरुवात केली.

**विधिर बाँधन काटबे तुमि एमन शक्तिमान–**
**तुमि कि एमनि शक्तिमान ।**
**आमादेर भाङागड़ा तोमार हाते एमन अभिमान–**
**तोमादेर एमनि अभिमान ।।**
**चिरदिन टानबे पिछे, चिरदिन राखबे नीचे–**
**एत बल नाइ रे तोमार, सबे ना सेइ टान ।।**
**शासने यतइ घेर' आछे बल दुर्बलेरओ,**
**हओ–ना यतइ बड़ो आछेन भगवान ।**
**आमादेर शक्ति मेरे, तोराओ बाँचबि ने रे,**
**बोझा तोर भारी हलेई डुबबे तरीखान ।।**

"विधिनिर्मित बंध तुम्ही तोडून टाकणार एवढे का तुम्ही शक्तिमान्! आम्हांला खाली पाडणें किंवा उभें करणें, जोडणें आणि मोडणें हे सर्वस्वी आपल्या हाती आहे, असा आहे का तुमचा अहंकार! चिरकालपर्यंत मागें खेंचण्याची, चिरकाल खाली ठेंचण्याची ताकद नाही तुमच्यांत. आम्हांला ताणून धरता नाही येणार तुम्हांला. ताण नाही टिकणार तो. हुकुमशाही कायद्यांनी आम्हाला कितीही घेरून टाकलेंत तरी त्यांचा भेद करण्याएवढी शक्ति, आम्ही आज दुर्बल असलों तरी, आमच्यांत आहेच आहे. तुम्ही केवढेहि बडे असा, तुमच्याहून भगवान बडा आहे. आमची शक्ति खच्ची करून तुम्ही जणु काय वांचणार!! अरे, बोजा भारी होतांच तुमची शासननौकाहि बुडून जाईल. तिच्यासकट तुम्हीहि बुडून जाल. नाही राहणार तुम्ही जाग्यावर." (रवीन्द्रनाथ जीवनकथा, गं. दे. खानोलकर, पृष्ठ - २४५)

हजारो लोकांनी रवीन्द्रनाथांच्या सुरामध्ये सूर मिळवला. आनंदमोहन बोस अध्यक्षस्थानी होते. अतिशय आजारी असून सभेस आलेल्या आनंदमोहन बोस यांच्या इंग्रजी भाषणाचा अनुवाद रवीन्द्रनाथांनी सर्वांना वाचून दाखवला. सभा संपली आणि रवीन्द्रनाथांचे ('त्यांचा ध्वज धुळीला मिळेल') 'ओदेर धुलाय ध्वजा लुटाबे' हे गीत गात पुन्हा लोक मिरवणुकीने परत निघाले.

संपूर्ण वंगभंगविरोधी आंदोलनाचे नेतृत्व रवीन्द्रनाथांनी केले नसले, तरी या आंदोलनउभारणीत रवीन्द्रनाथांचा महत्त्वाचा वाटा होता. प्रत्यक्ष फाळणीच्या दिवशी जनतेने दाखवलेल्या निषेधाचे खरेखुरे नायक रवीन्द्रनाथच ठरले होते. आपल्या गीतांनी वंगभंगविरोधी आंदोलनाला चेतना देणारे रवीन्द्रनाथ राजप्रशस्तीसाठी 'जन-गण-मन' लिहू शकतील का, याचा विचारही त्यांच्या टीकाकारांनी केलेला दिसत नाही. अशी राजप्रशस्ती लिहिली, असा रवीन्द्रनाथांवर आरोप करणे म्हणजे रवीन्द्रनाथांनी वंगभंगविरोधी आंदोलनात आपल्या राष्ट्रभक्तीने ओथंबलेल्या काव्यरचनेच्या माध्यमातून केलेल्या महान कार्याचे अवमूल्यन केल्यासारखेच आहे.

# ‘जन-गण-मन’ची निर्मिती

बंगभंगविरोधी आंदोलनाला रवीन्द्रनाथांनी चालना दिली. पण त्यापूर्वी एका वेगळ्या क्षेत्राकडे ते वळले होते. बोलपूरच्या शांतिनिकेतनमध्ये ‘ब्रह्मचर्याश्रम’ या विद्यालयाची स्थापना १९०१ मध्ये त्यांनी केली होती. गुरुकुल पद्धती आणि प्राचीन तपोवनाप्रमाणे त्याचे स्वरूप होते. त्याची व्यवस्था करण्यात रवीन्द्रनाथ गुंतून गेले होते.

शांतिनिकेतनमधील या ‘ब्रह्मचर्याश्रमा’त वेगवेगळे शैक्षणिक प्रयोग करण्यामध्ये रवीन्द्रनाथ रमले होते. पण त्याच वेळी १९०५ मध्ये लॉर्ड कर्झनने बंगालची फाळणी जाहीर केली आणि रवीन्द्रनाथ या आंदोलनात आपोआपच ओढले गेले.

बंगालच्या फाळणीपाठोपाठ झालेली ‘मुस्लीम लीग’ची स्थापना आणि हिंदू-मुस्लीम यांच्यात वाढत जाणारी तेढ यामुळे ते अस्वस्थ झाले होते. १९०५ साली बंगालची फाळणी करतानाचा इंग्रजांचा हेतू हळूहळू साध्य होऊ लागला होता.

राष्ट्रीय सभेच्या डिसेंबर १९०७ मध्ये भरलेल्या सुरतच्या अधिवेशनात फूट पडली. जहाल आणि मवाळ असे दोन स्पष्ट गट एकमेकांविरुद्ध झुंजू लागले. जुलै १९०८ मध्ये राजद्रोहाच्या आरोपावरून लोकमान्य टिळकांवर खटला चालून त्यांना सहा वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा ठोठावण्यात आली. व त्यांची रवानगी दूरवर मंडालेच्या तुरुंगात करण्यात आली. राष्ट्रीय आंदोलनावरचा लोकमान्य टिळकांचा आणि एकूणच जहाल विचारसरणीचा प्रभाव कमी करण्याचा इंग्रजांचा हेतू होता. त्यापूर्वीच बडोद्याची नोकरी सोडून अरविंद घोष ‘बंगाल नॅशनल कॉलेज’मध्ये मुख्य आचार्य म्हणून आले. बिपिनचंद्र पाल यांनी ७ ऑगस्ट १९०६ रोजी सुरू केलेल्या ‘वन्दे मातरम्’ या इंग्रजी दैनिकाचे ते पुढे संपादकही झाले. अरविंदांच्या तेजस्वी विचारसरणीमुळे बंगालमधल्या चळवळीला पुन्हा वेग येऊ लागला.

‘रवीन्द्रनाथांना ज्या विशाल आध्यात्मिक भूमिकेवरून राष्ट्रधर्माचा स्वदेशाने स्वीकार करावा, असे वाटत होते, ती भूमिका स्वीकारण्याची स्वबांधवांची तयारी नाही हे पाहून, ते हळूहळू चळवळीपासून दूर होऊ लागले होते. अरविंदांच्या



बंगालच्या तरुणांचे प्रेरणास्थान अरविंद घोष.



भारतीयांच्या असंतोषाचे जनक लोकमान्य टिळक

आगमनाने त्यांच्या आशा पुन्हा पल्लवित झाल्या. नव्या पिढीला योग्य नेता मिळाल आहे, असे रवीन्द्रनाथांना वाटले आणि एके दिवशी आपण राजकीय क्षेत्रातून निवृत्त होत असल्याचे त्यांनी अकस्मात जाहीर केले. त्यांच्या निवृत्तीचे इंगित न कळल्यामुळे 'पळपुटा', 'राष्ट्रद्रोही', 'भेकड' अशा तऱ्हेच्या शेलक्या शिव्यांनी, स्वत:स 'देशभक्त म्हणवणाऱ्यांकडून त्यांची संभावना झाली. मत्सरग्रस्तांनी त्यांच्या विरुद्ध नाना तऱ्हेचे प्रवाद उठविले. परंतु त्यांच्या नेहमीच्या वृत्तीनुसार त्यांनी त्यांची दखल घेतली नाही प्रत्यक्ष राजकीय चळवळीतून जरी त्यांनी अंग काढून घेतले असले, तरी सर्व प्रकारच्या राजकीय घडामोडींकडे त्यांचे लक्ष असे.' (रवीन्द्रनाथ जीवनकथा गं. दे. खानोलकर, पृष्ठ - २५३)

बंगालमध्ये क्रांतिकारकांच्या गुप्त चळवळींना वेग आला होता. मुजफ्फरपूरचे सेशन्स जज्ज किंग्जफोर्ड यांच्या गाडीवर खुदीराम बोस आणि प्रफुल्लचंद्र चाकी यांनी बाँब टाकला. पाठोपाठ क्रांतिकारकांच्या माणिकतोला येथील बाँब तयार करण्याच्या गुप्त कारखान्याचा इंग्रजांना शोध लागला. धरपकड झाली. अरविंद आणि त्यांचे बंधू बारींद्रकुमार यांच्यावर खटला दाखल झाला. या खटल्यात अरविंदांनी आपला बचाव अत्यंत प्रखर, स्पष्ट भाषेत केला. ते म्हणाले, 'माझ्या देशबांधवांपुढे मी स्वातंत्र्यप्राप्तीचे ध्येय ठेवले आणि हे ध्येय जनतेपुढे ठेवणे कायद्याविरुद्ध असल्यास तो आरोप माझ्याकडून घडला ही गोष्ट मला मान्य आहे. परंतु जे गुन्हे माझ्याकडून घडले नाहीत ते गुन्हे मला चिकटवू नका. स्वातंत्र्याचे ध्येय जनतेपुढे ठेवण्यासाठी मी सुखसर्वस्वाचा त्याग केला व त्यासाठीच मी नोकरीवर पाणी सोडून बडोद्याहून कलकत्ता येथे आलो. मी जगलो तो या ध्येयासाठी व आजपर्यंत जे काही उद्योग केले तेही त्याच ध्येयाच्या सिद्धीसाठी. जागेपणी ह्या विचारांशिवाय दुसऱ्या कशाचीही स्वप्ने मला पडली नाहीत.'

या खटल्यामध्ये अरविंदांनी मांडलेल्या मुद्द्यांमुळे रवीन्द्रनाथांचा त्यांच्याबद्दलचा आदर वाढला आणि त्यांचा गौरव करणारे गीत त्यांनी लिहिले.



बादशहा पंचम जॉर्ज पत्नीसह.

'अरविन्द, रवीन्द्रेर लह नमस्कार ।
हे बंधू, हे देशबंधू, स्वदेश आत्मार
वाणी-मूर्ति तुमि ।'

अरविंदांच्या स्वदेशनिष्ठेबद्दल आणि राष्ट्रभक्तीबद्दल रवीन्द्रनाथांच्या मनात आदर असला, तरी क्रांतिकारकांनी स्वीकारलेल्या मार्गाबद्दल मात्र ते काहीसे व्यथित होत होते व त्याच वेळी हिंदू-मुस्लीम ऐक्य कमी होत असल्याचे त्यांना जाणवत होते. हे ऐक्य टिकून राहण्यासाठी ते आपल्या लेखनातून व भाषणातून वारंवार समजावत होते. दुर्दैवाने त्यांच्या या सांगण्याकडे फारसे कोणी लक्ष दिले नाही.

वंगभंग जाहीर केल्यानंतर जवळ जवळ सहा वर्षांनी १९११ मध्ये बंगालची फाळणी रद्द करत असल्याचे सरकारने जाहीर केले. हिंदू-मुस्लिमांमध्ये फूट पाडण्याचे काम या फाळणीनंतरच्या दोन-तीन वर्षांनंतरच्या घडामोडींमुळे सुरू झाले होते. व ज्या हेतूने ब्रिटिशांनी बंगालचे विभाजन केले, तो हेतू मात्र साध्य होण्यास सुरुवात झाली होती. आता तर ही फाळणी रद्द करून त्याचे श्रेय घेण्याची संधी सरकारने घेण्याचे ठरवले आणि त्यासाठी योग्य मुहूर्तही नक्की केला.

१२ डिसेंबर १९११ रोजी इंग्रज बादशहा पंचम जॉर्ज यांनी दिल्लीत एक दरबार भरवून तेथेच बंगालची १९०५ मधली फाळणी रद्द करण्याचे घोषित करण्याचे ठरवले. इथल्या जनतेचा, त्यांच्या आंदोलनाचा आम्ही विचार करीत आहोत व मोठ्या दयाळूपणे त्यांची मागणी मान्य करीत आहोत, असाच आव त्यामध्ये होता.

लोकमान्य टिळकांसारखे जहाल नेते तुरुंगात असताना राष्ट्रीय सभेतील मवाळ गटालाच चुचकारून राष्ट्रीय चळवळीला लगाम लावण्याच्या हेतूनेच बंगालची फाळणी स्वत: बादशहा भारतात येऊन रद्द करत होते, याला एक वेगळा अर्थ होता. परंतु फक्त दरबार भरवून हा निर्णय जाहीर करून भागणार नव्हते, तर हा निर्णय जनतेच्या दरबारात पोहोचवण्याची गरज अधिक होती.

वास्तविक वंगभंगविरोधी आंदोलन जनतेने थंड होऊ दिले नव्हते. जनतेने केलेल्या संघर्षापुढे झुकून फाळणी रद्द करणे इंग्रजांना कधी ना कधीतरी भाग पडणारच

होते; पण त्याचे श्रेय मात्र चळवळीच्या नेत्यांना न देता दातृत्वाचा आव आ बादशहांना स्वत:कडे घ्यायचे होते. याचे कारण त्याच महिन्यात २६ डिसेंबर कलकत्ता येथे राष्ट्रीय सभेचे अधिवेशन होणार होते व त्यासुमारास बादशहा कलकत्त्या येणार होते. या अधिवेशनात पुन्हा एकदा इंग्रजी सत्तेच्या राजनिष्ठेचे सूर इंग्रजां हाताशी धरलेला राष्ट्रीय सभेतील मवाळ गट आळवणार, हे रवीन्द्रनाथांना स्प दिसत होते. जणूकाही वंगभंग रद्द करण्याचा निर्णय म्हणजे बादशाही कृपाप्रसाद आ आणि त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी मवाळ नेत्यांमध्ये जणू चढाओढ सु झाली. कलकत्त्याच्या अधिवेशनाच्या सुमारास बादशहा उपस्थित राहणार असल्यामु बंगाली जनतेच्या भावनांचा मान बादशहाने राखला आहे, तेव्हा बंगाली जनते त्याबद्दलची कृतज्ञता व्यक्त केली पाहिजे, असे मवाळ नेत्यांना वाटू लागले हो रवीन्द्रनाथांना राजनिष्ठेचे हे प्रदर्शन असह्य होत होते.

रवीन्द्रनाथ हे तत्कालीन बंगाली जनतेच्या हृदयाचे अनभिषिक्त सम्राट हो तेव्हा त्यांच्याकडून इंग्लंडच्या बादशहाची स्तुती लिहून घेणे म्हणजे संपूर्ण बंगा जनतेनेच बादशहाची प्रशस्ती केल्यासारखी होईल, असा विचार अधिवेशनाच्य आयोजक नेत्यांनी केला. कलकत्त्यात भरणाऱ्या प्रत्येक अधिवेशनात रवीन्द्रनाथां एक आदरणीय स्थान असे. १८८६ मध्ये कलकत्त्यात भरलेल्या राष्ट्रीय सभेच दुसऱ्या अधिवेशनात रवीन्द्रनाथांनी

**'आमरा मिलेछि आज मायेर डाके ।**
**घरेर हये परेर मतन भाइ छेड़े भाइ कदिन थाके ।।'**

हे गीत गायले होते, तर १८९६ मध्ये 'वन्दे मातरम्'चे पहिले जाहीर गा रवीन्द्रनाथांनी याच राष्ट्रीय सभेच्या व्यासपीठावरून केले होते.

कलकत्ता काँग्रेसची सर्व सूत्रे राजनिष्ठ मवाळांकडे होती. या निमित्ताने पं जॉर्जच्या स्वागतासाठी राजप्रशस्तिपर गीत रवीन्द्रनाथांकडून लिहून घ्यावे, अ कल्पना आयोजकांना सुचली.

रवीन्द्रनाथांना हा विचार कधीच मानवणारा नव्हता. आयोजकांनाही त्या कल्पना होती आणि म्हणूनच राजप्रशस्तिपर गीत लिहून द्यावे, अशी विनंती करण्यास या नेत्यांकडून रवीन्द्रनाथांचे एक नातेवाईक आणि पाथुरीया ठाकूर घराण्यापै प्रद्योतकुमार ठाकूर यांना गळ घालण्यात आली. प्रद्योतकुमार ठाकूर हे रवीन्द्रना निकटवर्तीय, रवीन्द्रनाथांच्या वृत्तीला ओळखणारे, तरीही त्यांनी आपल्याला विनंती करावी, याचे रवीन्द्रनाथांना क्षणभर आश्चर्य वाटले. त्यांनीही आपल्या ओळखू नये याचे त्यांना अतीव दु:ख झाले. रवीन्द्रनाथांच्या अतिशय संवेदनशी कविहृदयाला एक धक्का बसला. रवीन्द्रनाथ एक कवी जरूर होते; पण तोप त्यांनी आपली प्रतिभा कुणाच्याही दावणीला बांधलेली नव्हती. प्रसंगानुरूप माग तसा पुरवठा करणाऱ्या कविपरंपरेतली त्यांची कविता नव्हती. रवीन्द्रनाथांना स्वत:



डिसेंबर १९११ च्या कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष बिशन नारायण धर.



या अधिवेशनात 'अतित गौरव वाहिनी मम वाणी' हे गीत गाणाऱ्या प्रसिद्ध कवयित्री व गायिका सरलादेवी चौधुरानी.

कवित्वाबद्दल एक विश्वास होता, दुराभिमान कधीच नव्हता. त्यामुळे अशी मागणी करण्याच्या हेतूमुळे ते व्यथित झाले आणि त्या अस्वस्थ मनक्षोभातून 'जन-गण-मन'चा जन्म झाला. मनक्षोभ झाला, तरीही रवीन्द्रनाथांनी अधिवेशनाचे निमंत्रण स्वीकारले नाही व मुद्दामहून लिहिलेल्या 'जन-गण-मन' चे सादरीकरण या व्यासपीठावरून त्यांनी केले.

## १९११ चे ऐतिहासिक अधिवेशन व 'जन-गण-मन'चा जन्म

दि. २६, २७ व २८ डिसेंबर १९११ या तीन दिवसांत कलकत्ता येथे राष्ट्रीय सभेचे अधिवेशन होणार होते. कलकत्ता अधिवेशनाचे अध्यक्ष बिशन नारायण धर होते. बिशन नारायण धर हे उत्तर प्रदेशातील स्वातंत्र्यचळवळीचे अग्रणी नेते होते. सरकारच्या धोरणांवर अत्यंत धाडसी, घणाघाती टीका करणारे ते उत्तम लेखकही होते. आपल्या वकिलीचा उपयोगही त्यांनी प्रामुख्याने सरकारने विनाकारण राजद्रोहाच्या खटल्यांमध्ये गोवलेल्या देशभक्तांच्या बचावासाठीच केला. धर्म आणि सामाजिक सुधारणा याबद्दल उदार विचार असलेल्या धर यांची निवड या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून करण्यात आली होती.

बादशहा पंचम जॉर्ज मात्र या अधिवेशनानंतर एक-दोन दिवसांत सपत्नीक कलकत्त्यात येणार होते. बंगालची फाळणी रद्द केल्याचा आनंद व्यक्त करण्याची संधी या अधिवेशनात साधून याच विषयाला अधिवेशनात महत्त्वाचे स्थान देण्यात आले. या तीन दिवसांच्या अधिवेशनाची सुरुवात २६ तारखेला म्हणजेच पहिल्या दिवशी 'वन्दे मातरम्' गीतानेच झाली. दुसऱ्या दिवशीच्या म्हणजे २७ तारखेच्या अधिवेशनाची सुरुवात रवीन्द्रनाथांच्या नुकत्याच लिहिलेल्या 'जन-गण-मन' या गीताने झाली. हे गीत व्यासपीठावर नक्की कोणी सादर केले, याचा नेमका तपशील मिळत नाही, परंतु बहुधा रवीन्द्रनाथांनीच स्वत: इतर काही गायकांबरोबर हे सादर केले असावे.

**'जन-गण-मन' हे गीत जनतेसमोर सर्वप्रथम येण्याची ही ऐतिहासिक घट होती.** हे गीत या अधिवेशनाच्या साधारण ८-१५ दिवस आधी लिहिले असावे. गीत लिहिले, त्या तारखेची नोंदही रवीन्द्रनाथांच्या टिपणात किंवा चरित्रात आढ नाही. साधारण नोव्हेंबर-डिसेंबर महिन्यांतच रवीन्द्रनाथांना या अधिवेशनास स्तुतिगीत लिहिण्याची गळ घातली गेली व त्यानंतरच रवीन्द्रनाथांनी हे गीत लिहि

२७ तारखेला अधिवेशनाची सुरुवात होताना 'जन-गण-मन' हे गीत सादर के गेले आणि समोरचा जनसमुदाय क्षणभर आश्चर्यचकित होऊन गेला. रवीन्द्रनाथां काव्यप्रतिभेचा परिचय कलकत्तावासीयांना नवा नव्हता, परंतु आजच्या या कवितेच निमित्ताने त्यांच्या काव्यप्रतिभेचे झालेले दर्शन मात्र अद्‌भुत होते. राजप्रशस्ती लि द्या, अशी मागणी करणाऱ्यांना रवीन्द्रनाथांनी आपल्या कवितेतूनच रोखठोक उ दिले होते. पण तरीही या कवितेवर राजप्रशस्तीचाच ठपका ठेवला गेला, ही एक वस्तुस्थिती आहे. 'जन-गण-मन' ही कविता एका अस्वस्थ मन:स्थितीत प्र मन:क्षोभातून निर्माण झाली आणि नंतरही या गीतावर झालेल्या आरोपांमु रवीन्द्रनाथांना भरपूर मनस्ताप झाला. रवीन्द्रनाथांनी आपल्या आत्मचरित्रात आपल अनेक कवितांच्या, नाटकांच्या निर्मितीच्या कथा सांगितल्या आहेत. 'जन-ग मन'विषयी मात्र रवीन्द्रनाथांनी फार कमी लिहिले आहे. पुढे वाढत गेलेल्या आरोपांना रवीन्द्रनाथांनी प्रत्येक वेळी उत्तर दिले नसले, तरी या आरोपांचे खं करणारी त्यांची दोन पत्रे उपलब्ध आहेत. 'जन-गण-मन'विषयीच्या या आक्षेपांब आपण पुढे पाहणारच आहोत.

दुसऱ्या दिवशीच्या म्हणजे २७ तारखेच्या अधिवेशनाच्या सुरुवातीला 'ज गण-मन' चे सादरीकरण झाल्यानंतर अधिवेशनाच्या प्रत्यक्ष कामकाजास सुरु झाली. काँग्रेस हितचिंतकांकडून आलेल्या शुभेच्छाप्रदर्शक संदेशांचे वाचन झाले. वाचनानंतर बादशहाच्या स्वागताचे ठराव पारित करण्यात आले. त्यानंतर हिंदीम रचलेले 'युग जीवो मेरा पादशा' हे राजप्रशस्ती गीत सादर करण्यात आले.

रवीन्द्रनाथांनी राजप्रशस्ती गीत लिहिण्यास नकार दिल्यानंतर 'युग जीवो मे पादशा' हे हिंदी गीत काँग्रेसच्या नेत्यांनी अन्य कवीकडून लिहून घेतले.

अधिवेशनाच्या तिसऱ्या व अखेरच्या दिवशी २८ तारखेला रवीन्द्रनाथां भाची (स्वर्णकुमारीदेवी या बहिणीची कन्या) प्रसिद्ध कवयित्री व गायिका सरलाद चौधुराणी यांनी लिहिलेल्या व सादर केलेल्या 'अतीत गौरव वाहिनी मम वाणी' गीताने अधिवेशनाची सुरुवात झाली.

या अधिवेशनात जी एकूण चार गीते सादर झाली, त्यात बंकिमचंद्रांचे 'व मातरम्' व सरलादेवी चौधुराणींचे 'अतीत गौरव वाहिनी मम वाणी' ही दोन्हीही ग देशभक्तिपरच होती. या अधिवेशनाचे जे वृत्तांत पुढच्या दोन-तीन दिवसांच वृत्तपत्रांमध्ये प्रसिद्ध झाले, त्यात उरलेली दोन गीते म्हणजेच 'जन-गण-मन'

'युग जीवो मेरा पादशा' या दोन्ही गीतांबद्दल लिहिताना गोंधळ केला गेला. विदेशी वृत्तपत्रांनी केलेल्या गोंधळामुळे व चुकीच्या वृत्तांकनामुळे 'युग जीवो मेरा पादशा'च्या जोडीने 'जन-गण-मन' गीतावरही राजप्रशस्तीचा ठपका ठेवला गेला.

## वृत्तपत्रातील चुकीचे वृत्तांकन

दि. २८ डिसेंबरच्या 'अमृतबजार पत्रिका'मध्ये लिहिले आहे,

'काँग्रेस अधिवेशनाचा २७ तारखेचा कार्यक्रम एका बंगालीत रचलेल्या प्रार्थना-गीताने (a Bengali song of Benediction ने) सुरू झाला व त्यानंतर अध्यक्षांनी मांडलेला बादशहाच्या स्वागतासंबंधीचा ठराव संमत होऊन त्यानंतर लगेच राजदांपत्याच्या आगमनाप्रीत्यर्थ रचलेले गीत गायले गेले.'

सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांच्या 'बेंगाली' या वृत्तपत्रात दि. २९ च्या अंकात म्हटले आहे. 'The proceddings commenced with a patriotic song composed by Babu Rabindranath Tagore, the leading poet of Bengal, --- of which we give an English transation 'King of the hearts of nation, Lord of Country's fate' etc.''' -- 'A Hindi Song paying heart-felt homage to their Imperial Majesties was sung by the Bengali boys and girls in chorus.'

काँग्रेसतर्फे प्रकाशित झालेल्या या अधिवेशनाच्या वृत्तांतामध्ये म्हटले आहे, '२७ डिसेंबरच्या अधिवेशनाच्या कार्यक्रमाचा प्रारंभ बाबू रवीन्द्रनाथ ठाकूर यांनी रचलेल्या देशभक्तिप्रेरित (patriotic song) गीताने झाला. त्यानंतर रॅम्से मॅकडोनाल्ड आदी काँग्रेस हितचिंतकांचे संदेश वाचून दाखवले गेले. मग बादशहांसंबंधी ठराव होऊन राजदांपत्याच्या स्वागताप्रीत्यर्थ खास रचलेले वृंदगीत म्हणण्यात आले.'

भारतीय पत्रकारांनी चालवलेल्या वर्तमानपत्रांमध्ये ही अशी वृत्ते आली असताना ब्रिटिशांचा प्रभाव असलेल्या वृत्तपत्रांनी मात्र वृत्तांकन करताना गोंधळ केला होता. 'इंडिया' नावाच्या वृत्तपत्रात रॉइटर वृत्तपत्रसंस्थेच्या बातमीदाराने दिलेली बातमी होती : 'दि. २९ डिसेंबर १९११ रोजी, डिसेंबर २७ बुधवार रोजी इंडियन नॅशनल काँग्रेसची बैठक भरली. यावेळी सम्राटांच्या आगमनाप्रीत्यर्थ खास रचलेले एक बंगाली गीत गायले गेले व सम्राट दांपत्याच्या स्वागतार्थ मांडलेला ठराव सर्वानुमते संमत करण्यात आला.'

२८ डिसेंबर १९११ च्या 'इंग्लिशमन' या कलकत्त्याच्या वृत्तपत्रातील बातमी-

'२७ डिसेंबरच्या कार्यक्रमाची सुरुवात बाबू रवीन्द्रनाथ ठाकूर यांनी सम्राटांच्या स्वागताकरिता खास रचलेल्या स्वागतगीताने झाली. त्यानंतर सम्राट दांपत्याप्रीत्यर्थ हिंदीत रचलेले स्वागतगीत गायले गेले.'

२८ डिसेंबरच्या 'स्टेट्समन'मध्ये लिहिले होते.

'या दिवसाच्या कार्यक्रमाची सुरुवात दुपारी १२ च्या सुमारास एका बंगाली

गीताने झाली व त्यानंतर बाबू रवीन्द्रनाथ ठाकूर या बंगाली कवींनी खास य प्रसंगाकरिता सम्राटांच्या स्वागतार्थ रचलेले वृंदगीत मुलींनी गाऊन दाखवले.'

कार्यक्रमाच्या आशयाबद्दल माहिती नसणारे वार्ताहर वृत्तांकन करताना अर्धव माहितीच्या आधारे अंदाजाने चुकीचे वृत्तांकन करतात, हा अनुभव आजच्या काळात येतो. या तीनही वृत्तपत्रांच्या प्रतिनिधींनी सादर झालेल्या गीतांविषयी पुरेशी माहि करून न घेतल्यामुळे रवीन्द्रनाथांचे गीत व नंतरच्या 'युग जीवो मेरा पादशा' या हि गीताची सरमिसळ केली. कदाचित् भाषा न समजल्यामुळे किंवा ब्रिटि वृत्तपत्रचालकांच्या प्रभावामुळेही हे असे वृत्तांकन केले गेले असण्याची शक्य आहे, परंतु अशा वृत्तांकनामुळे पुढच्या काळात केवढी गडबड होणार आहे त्यामुळे रवीन्द्रनाथांसारख्या कवीवर कोणत्या प्रकारचे आक्षेप घेतले जातील, याच कल्पनाही त्यावेळी या वार्ताहरांना आली नसेल. या अँग्लो-इंडियन वृत्तपत्रां केलेल्या वृत्तांकनामुळे रवीन्द्रनाथांसारख्या प्रखर देशभक्ताच्या देशभक्तीबद्दल शंका घेतली गेली. रवीन्द्रनाथांनी दोन अपवाद वगळता याचा कधीही नि:संदि प्रतिवाद न केल्यामुळे संशयाचे धुके अधिकच वाढले. या गीताचा अर्थ, आश रवीन्द्रनाथांच्या इतर कवितांचा धोरणात्मक अभ्यास करताना अधिक सम शकतो. 'जन-गण-मन' व रवीन्द्रनाथ यांच्यावर टीका करणाऱ्यांनी रवीन्द्रनाथां इतर काव्य व चरित्र न अभ्यासल्यामुळे अशी टीका वारंवार होत राहिली.

## 'जन-गण-मन'च्या लेखनानंतर

२७ डिसेंबर १९११ रोजी राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात 'जन-गण-मन' प्रथम लोकांसमोर आले. त्यानंतर पुढच्याच महिन्यात स्वत: रवीन्द्रनाथ संपादक असलेल 'तत्त्वबोधिनी' या अंकात 'जन-गण-मन' हे गीत 'भारतविधाता' या नावाने प्रथम प्रकाशित झाले व त्याचे वर्णन स्वत: रवीन्द्रनाथांनी 'ब्राह्मसंगीत' असे केले होते

या काळातील सर्व घडामोडींवर 'रवींद्र संजीवनी' द्वितीय खंड, लेखक प्रभातकुमार मुखोपाध्याय, या ग्रंथाच्या शेवटी प्रबोधचंद्र सेन यांनी परिशिष्टाम 'जन-गण-मन'च्या इतिहासाबद्दल लिहिलेल्या माहितीच्या आधारे, प्रा. वि. म बेडेकर यांनी 'नवभारत' जानेवारी १९५८ च्या अंकात एक प्रदीर्घ लेख लिहि आहे. या काळातील घडामोडींवर प्रकाश टाकणारा मराठीतील हा एकमेव अभ्यासप लेख आहे.

या लेखात प्रा. वि. म. बेडेकर लिहितात, "१९१२ जानेवारीच्या 'भारत नावाच्या पत्रिकेच्या अंकात 'वन्दे मातरम्', 'जन-गण-मन', 'अतीत गौरववाहि ही देशभक्तिप्रेरित गीते काँग्रेस अधिवेशनात गायिली जात असताना श्रोतृवृंदावर परिणाम झाला, त्याच्या प्रत्यक्ष अनुभवाचे रसाळ वर्णन आले आहे. पहिल

[illegible] भारतवर्षाच्या सुजला, सुफला मातृभूमीचे, दुसऱ्या दिवशी मानवजातीच्या भाग्य विधात्याचे – जो 'परित्राणाय साधूनां, विनाशाय च दुष्कृताम्' असा युगे युगे स्वतःला प्रकट करीत असतो अशा त्रिलोकनाथाचे, तिसऱ्या दिवशी अतीतगौरवस्मृति-रत्नांची खाण जो हिंदुस्थान त्याचे – अशी वन्दन गीते गायिली गेली. बालिकांच्या सुमधुर स्वरांतून आणि युवकांच्या सुगंभीर कंठांतून निघालेली ही गीते जेव्हा मंडपात निनादू लागली, तेव्हा हृदये भक्तिपरिपूर्ण आणि नयन अश्रुसिक्त झाले. धुपाचा [illegible] सुंदर सुवास ज्याप्रमाणे पूजेला अनुकूल अशी मनोवृत्ती निर्माण करतो, त्याप्रमाणे त्या तरुण युवकबालिकांच्या कंठांतून निनादणाऱ्या गीतांनी अंत:करणात भक्तीचा संचार झाला.' या वर्णनात हिंदी राजप्रशस्तिगीताचा चुकूनही उल्लेख नाही, ही गोष्ट नजरेत भरल्याशिवाय रहात नाही.''

याच लेखात पुढे श्री. बेडेकर लिहितात, ''याच सुमारास म्हणजे २५ जानेवारी १९१२ रोजी म्हणजे काँग्रेस अधिवेशनानंतर एक महिन्याच्या आतच कलकत्ता येथे [illegible] माघोत्सव सभेमध्ये 'जन-गण-मन' हे गीत गायिले गेले. ज्या स्थानी व प्रसंगी हे गीत म्हटले गेले, त्यावरून तेथील श्रोत्यांच्या दृष्टीने त्या गीताचे लक्ष्य काय असावे, याबद्दल शंका राहत नाही. त्या माघोत्सव सभेत स्वत: रवीन्द्रनाथांनी '[illegible] नवयुग' या नावाचे जे भाषण केले, त्या भाषणाचा शेवट असा होता : 'भूमी' किंवा विश्वव्यापी ब्रह्म या तत्त्वाच्या मार्गावर अखिल मानवजातीची विजययात्रा चालू आहे. आपणाजवळ जे काही असेल, त्यासह आपण या विजययात्रेला निर्भयपणे [illegible] देऊ शकतो. 'जय जय जय हे, जय विश्वेश्वर, मानव-भाग्यविधाता ।' यावरून असे अनुमान निघू शकते की, धर्माच्या बृहत् विशाल भूमिकेवरून ज्याला विश्वेश्वर किंवा मानवभाग्यविधाता म्हटले आहे, त्यालाच देशभक्तीच्या भूमिकेतून 'भारतभाग्यविधाता' म्हटले आहे. त्यांच्या स्वदेशावर रचलेल्या अनेक गीतांच्या मुळाशी ही भक्तिमिश्र देशात्मबोधाची प्रेरणा दिसून येते. म्हणूनच 'जन-गण-मन' हे गीत काँग्रेस अधिवेशनात व माघोत्सवात अशा दोन्हीही जागी गायले जाऊ शकले. राष्ट्रगीत आणि भगवद्गीत अशी दोन्हीही स्वरूपे या गीतात एकवटली आहेत. महात्मा गांधींनी या गीताचे वर्णन ''ते एकाच वेळी राष्ट्रगीत (National Song) व भक्तिगीत (Devotional Hymn) होय'', असे जे केले आहे ('हरिजन' १९ मे १९४६), ते याच दृष्टीने मार्मिक व अर्थपूर्ण आहे.

वर उल्लेखिलेल्या माघोत्सवानंतर, दुसऱ्या दिवशी २६ जानेवारी १९१२ ला 'बेंगाली' या वृत्तपत्रामध्ये त्यावेळच्या पूर्व बंगाल व आसामच्या शिक्षणाधिकाऱ्यांनी रवीन्द्रनाथांच्या संस्थेविरुद्ध काढलेले गुप्त सर्क्युलर प्रसिद्ध झाले. त्या सर्क्युलरचा आशय असा : ''बोलपूर येथे निघालेली शांतिनिकेतन किंवा ब्रह्मचर्याश्रम ही संस्था सरकारी नोकरांच्या मुलांच्या शिक्षणाला अगदी अयोग्य जागा होय. इत:पर या संस्थेत जे आपली मुले पाठवतील, त्यांच्या मुलांच्या भविष्यकाळावर या गोष्टीचा

अनिष्ट परिणाम होण्याचा संभव आहे.'' याबाबत लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की, गुप्त सर्क्युलर निघाले त्यावेळी काँग्रेस अधिवेशनात 'जन-गण-मन' गीत गायले जाऊन पुरा एक महिनाही लोटला नव्हता. अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांनी उठवल्याप्रमाणे रवीन्द्रनाथ जर खरोखरीच राजाचे स्तुतिपाठक बनलेले असते, तर वरील प्रकारच्या सरकारी सर्क्युलरचे काहीच प्रयोजन नव्हते!

पुढे १९१७ साली पुन्हा एकदा कलकत्त्याच्याच काँग्रेस अधिवेशनात 'जन-गण-मन' चांगले गाजले. आता काँग्रेसमध्ये जहाल राष्ट्रवादी गटाचे मताधिक्य होते व ॲनी बेझंट या अधिवेशनाच्या अध्यक्ष होत्या. स्वत: रवीन्द्रनाथ अधिवेशनाला हजर होते. पहिल्या दिवशी काँग्रेस सभापतींनी स्वत: रवीन्द्रनाथांना गीत वाचून दाखवायला सांगितले. अधिवेशनात तिसऱ्या दिवशी (२८ डिसेंबर १९१७) ते वृंदगीत म्हणून गायले होते. त्या अधिवेशनात देशबंधू चित्तरंजन दास यांनी आपल्या भाषणात 'जन-गण-मन' या गीताचा मोठा गौरवपूर्वक उल्लेख केला. ते म्हणाले ''आपण नुकतेच ऐकलेले गीत हे भारतवर्षाच्या वैभवाचे आणि विजयाचे गीत आहे (It is a song of the glory and victory of India) या व्यासपीठावर व मंडपात आपण भारतवर्षाच्या वैभवाकरिता व विजयाकरिताच जमलेलो आहोत.'' (मूळ इंग्रजीचा अनुवाद). वृत्तपत्रांनीही आपल्या वृत्तांतात या गीताचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख केला. 'बेंगाली'ने त्या गीताचे 'The Magnificent Song' (भव्य गीत), तर 'अमृतबाजार पत्रिकेने' 'An Inspiring Patriotic Song' (एक स्फूर्तिप्रद देशभक्तिपूर्ण गीत) असे वर्णन केले. नाटोरचे महाराज बहादुर यांनी वृंदात स्वत: सामील होऊन या वृंदगीताला वाद्याची साथ केली, असा मुद्दाम उल्लेख दोन्हीही वृत्तपत्रांनी केला. यावेळी 'स्टेट्समन्' या अँग्लोइंडियन वृत्तपत्राने या गीताचे 'A National Song' म्हणून वर्णन केले. याच 'स्टेट्समन'ने पूर्वी १९११ साली या गीताचे वर्णन 'राजप्रशस्तीचे गीत' असे केले होते, हे ध्यानात घेतल्यास त्याचे झालेले हे मतांतर पाहता १९११ साली त्याने या गीताविषयी प्रसिद्ध केलेला वृतान्त अज्ञानमूलक होता, हे स्पष्ट होईल.'' (भारतीय राष्ट्रगीताचा रचनाकालीन व नंतरचा संक्षिप्त इतिहास : प्रा. वि. म. बेडेकर नवभारत - जानेवारी १९५८)

### 'जन-गण-मन'चे इंग्रजी भाषांतर व पाश्चात्त्य पद्धतीने स्वरलेखन

जेम्स कझिन्स हे रवीन्द्रनाथांचे परिचित, आंध्र प्रदेशातील मदनापल्ली येथील 'बेझंट थिऑसॉफिकल कॉलेज'मध्ये प्राचार्य होते. ते प्रसिद्ध आयरीश लेखक, नाटककार, अभिनेते, संपादक, कवी व शिक्षक होते. थिऑसॉफी या विषयाचे ते चांगले अभ्यासक होते. त्यांच्या पत्नी मार्गारेट कझिन्स या आयर्लंडच्या स्वातंत्र्य चळवळीतील तसेच स्त्रीहक्क आंदोलनातील एक प्रमुख होत्या. त्यासाठी त्यांनी आयर्लंड, ब्रिटन आणि भारत या तिन्ही देशांचा कारावास भोगला होता. त्या उत्त



बेझंट थिऑसॉफिकल कॉलेजचे
प्राचार्य जेम्स कझिन्स.



आयरिश स्वातंत्र्यलढ्यातील प्रमुख नेत्या व
पाश्चात्त्य संगीताच्या अभ्यासिका मागरिट कझिन्स.

[illegible] होत्या. १९२२ मध्ये भारतात न्यायाधीश म्हणून नियुक्त झालेल्या त्या [illegible] स्त्री होत्या. कझिन्स दांपत्य भारतात स्थायिक झाले होते व ॲनी बेझंट यांनी स्थापन केलेल्या या कॉलेजचे प्राचार्य म्हणून जेम्स कझिन्स काम पहात होते. त्यांनी महाविद्यालयाच्या एका कार्यक्रमास रवीन्द्रनाथांना आमंत्रित केले.

मदनापल्ली हे गाव आंध्र प्रदेशात पश्चिम चित्तूर जिल्ह्यात आहे. मदनापल्ली या कॉलेजच्या निसर्गरम्य आवारात असलेल्या एका कुटीमध्ये रवीन्द्रनाथांचा मुक्काम होता. ह्याच कुटीमध्ये त्यांनी 'जन-गण-मन'चा इंग्रजी अनुवाद 'दि मॉर्निंग साँग ऑफ दि इंडिया' या नावाने केला. पुढे हे भाषांतर याच महाविद्यालयाच्या वार्षिक [illegible]मध्ये छापून आले. त्यानंतर पुढे १९२१ साली रवीन्द्रनाथांनी याचा आणखीन [illegible] इंग्रजी अनुवाद केला व तो 'मॉर्डन रिव्ह्यू'मध्ये प्रकाशित झाला.

या महाविद्यालयाच्या दि. २८ फेब्रुवारी १९१९ रोजी झालेल्या कार्यक्रमास रवीन्द्रनाथ उपस्थित राहिले. विद्यार्थ्यांच्या आग्रहावरून रवीन्द्रनाथांनी 'जन-गण-मन' चे गायन केले. या गीतातील 'जय हे' च्या शब्दांमध्ये विद्यार्थ्यांनी आपले सूर उत्स्फूर्तपणे मिळवले.

प्रा. कझिन्स यांनी आपल्या आत्मचरित्रात या प्रसंगाबद्दल लिहिले आहे. 'गुरुदेवांची शरीरयष्टी भव्य असली तरी आवाज फार कोमल होता. ते हे गीत गाऊ लागले की, भारतच चित्ररूपाने डोळ्यांसमोर उभा राहत असे. भारतातील निरनिराळी [illegible], नद्या या सर्वांचे उल्लेख गीतामध्ये येतात. पहिले कडवे ऐकतानाच मनात उत्सुकता निर्माण होते. दुसऱ्या कडव्यानंतर कंठ मुक्त होतात. आम्ही गुरुदेवांना पुन्हा पुन्हा हे गीत गायला सांगून त्यातील जय हे च्या जयजयकारात आमचे स्वर मिसळून गीत पूर्ण केले.'

ह्या गीत गायनानंतर उपस्थित सर्वचजण विलक्षण भारावून गेले होते. स्वत: मागरिट कझिन्सही या गीताने प्रभावित झाल्या होत्या. लंडन विद्यापीठातून संगीताची



मदनापल्ली येथील 'बेझंट थिऑसॉफिकल कॉलेज'.

पदवी प्राप्त केलेल्या मार्गारेट कझिन्स यांनी या गीताची संगीतरचना करण्याची इच्छ गुरुदेवांकडे व्यक्त केली व दुसऱ्याच दिवशी गुरुदेवांच्या मदतीने त्यांनी संगीतरच तयार करण्यास सुरुवात केली. गुरुदेवांकडून प्रत्येक शब्दाचा अर्थ समजून घेऊ त्यांनी स्वररचना तयार केली व लगेचच मोजक्या वाद्यांच्या साथीने आपल कॉलेजमधील विद्यार्थिनींकडून हे गीत रवीन्द्रनाथांसमोर सादर केले. स्वत: रवीन्द्रनाथां मार्गारेट कझिन्स यांचे कौतुक केले.

मार्गारेट कझिन्स या पाश्चात्त्य संगीताच्या तज्ज्ञ असल्यामुळे रवीन्द्रनाथां त्यांच्या मदतीने या गीताची स्वरलिपी (नोटेशन) तयार केली. मदनापल्लीच्या महाविद्यालयात रवीन्द्रनाथांनी केलेले इंग्रजी भाषांतर व नोटेशन यांची छायाप्र आजही जतन केलेली आहे.

'जन-गण-मन'चे लेखन झाल्यानंतरच्या पुढच्या काही वर्षांत अशा का मोजक्या घटना सोडल्या तर रवीन्द्रनाथांनी 'जन-गण-मन'चा प्रसार करण्या प्रयत्न मुद्दाम केल्याचे दिसत नाही.

बंगालच्या फाळणीविरुद्ध झालेल्या आंदोलनात 'वन्दे मातरम्'चे श सर्वसामान्यांपर्यंत पोहोचले व अल्पावधीत स्वातंत्र्यलढ्यातील ते एक शब्द शस्त्रच बनले. त्यामुळे या सर्व कालखंडात 'वन्दे मातरम्'ची मोहिनी आणि प्रभ संपूर्ण भारतीयांवर एवढा मोठा होता की, राष्ट्रगीताच्या जागी दुसऱ्या कोणत्य गीताचा विचार भारतीय लोक स्वप्नातही करू शकत नव्हते. त्यामुळे १९०६ च सुमाराला कवी इक्बाल यांनी लिहिलेले 'हिंदोस्ताँ हमारा' किंवा पुढच्या काळा 'सरफरोशी की तमन्ना', 'कदम कदम बढाये जा' यांसारखी गीते स्वातंत्र्याच चळवळीत गाजली, तरीही राष्ट्रगीताच्या स्थानापर्यंत पोहोचू शकली नाहीत. त 'जन-गण-मन' हे प्रथमपासूनच विवादात अडकवले गेले. त्यामुळे स्वातंत्र्यलढ्य

अन्य गीतांच्या तुलनेत त्याचा प्रसार काही प्रमाणात कमी झाला असला, तरी या गीताचे महत्त्व त्यामुळे कमी होत नाही.

रवीन्द्रनाथांच्या राष्ट्रभक्तीविषयी, निष्ठेविषयी शंका घ्यावी असा आशय खरोखरी 'जन-गण-मन'मध्ये आहे का? अनेक देशांवर गुलामगिरी लादणाऱ्या राजेशाहीचे मूर्तिमंत प्रतीक असणाऱ्या ब्रिटिश राजवटीच्या सर्वोच्च बादशहांचे - पंचम जॉर्जचे कौतुक रवीन्द्रनाथांनी करावे, इतकी त्या बादशहाची योग्यता होती का?

लोकांकडून होणाऱ्या कौतुकाबरोबर, प्रेमाबरोबर टीकाकारांचे बोचरे घावही टीकेची तयारी खऱ्या कलाकाराला ठेवावीच लागते. रवीन्द्रनाथांची वाढती लोकप्रियता, त्यांच्या साहित्याला सामान्य लोकांकडून मिळत असलेला उदंड प्रतिसाद, त्यांच्या यशस्वितेकडे वाटचाल करणारे 'शांतिनिकेतन'मधील शिक्षणातले प्रयोग आणि १९१३ मध्ये 'गीतांजली' या त्यांच्या काव्यसंग्रहाबद्दल त्यांना मिळालेला जागतिक साहित्यातील सर्वोच्च पुरस्कार या सर्व गोष्टी अनेकांच्या पोटदुखीचा विषय ठरणाऱ्या होत्या. नोबेल पुरस्कारापाठोपाठ ब्रिटिश सरकारला जाग येऊन त्यांनी 'सर' हा ब्रिटिशांचा सर्वोच्च पुरस्कारही रवीन्द्रनाथांना दिला.

'जन-गण-मन' च्या रूपाने रवीन्द्रनाथांच्या विरोधकांना, टीकाकारांना एक प्रभावी हत्यार मिळाले. 'जन-गण-मन'चा नेमका अर्थ न समजल्यामुळे रवीन्द्रनाथांवर हे आरोप ठेवले गेले. रवीन्द्रनाथांना अपेक्षित असणारा अर्थ टीकाकारांनी कदाचित मुद्दामही नाकारला असण्याची शक्यता आहे. भारतीय राज्यघटनेने 'जन-गण-मन'च्या पहिल्या कडव्याला राष्ट्रगीत म्हणून मान्यता दिल्यानंतर, आजही अनेकांच्या मनात 'जन-गण-मन' हे पंचम जॉर्जच्या स्वागतासाठी लिहिलेले गीत आहे, अशी भावना आहे. या सर्व टीकेचा विचार करण्याआधी 'जन-गण-मन'चा अर्थ आणि रवीन्द्रनाथांची एकूण जडणघडण याचा विचार करायला हवा.

## 'जन-गण-मन'चा अर्थ आणि आशय

रवीन्द्रनाथांचे वडील देवेन्द्रनाथ हे धर्मसुधारक आणि ऋषितुल्य व्यक्ती म्हणून प्रसिद्ध होते. राजा राममोहन रॉय यांनी स्थापन केलेल्या एकेश्वरी प्रणालीचे पुरस्कर्ते होते. महर्षी देवेन्द्रनाथांच्या या विचारसरणीचा, आचारशैलीचा रवीन्द्रनाथांवर प्रभाव पडणे साहजिकच आहे. स्वत: रवीन्द्रनाथ कोणत्याही एका धार्मिक विचारप्रणालीच्या आहारी गेल्याचे दिसत नाही. देवेन्द्रनाथांकडून आलेला हा वेगळा आध्यात्मिक जाणीव त्यांच्या अनेक कवितांमधून प्रकट झालेला दिसतो. 'जन-गण-मन' या कवितेलाही त्यांच्यातील आध्यात्मिक वृत्तीचा परिसस्पर्श झालेला आहे.

'जन-गण-मन'ही एक आध्यात्मिक विचारशैलीतील राष्ट्रभक्तिपर रचना आहे. ज्या जगन्नियंत्याने या विश्वाची निर्मिती केली, त्या जगन्नियंत्याला उद्देशून रवीन्द्रनाथांनी ही रचना केली आहे.



दुःस्वप्ने आतङ्के रक्षा करिले अङ्के
स्नेहमयी तुमि माता ।
जनगणदुःखत्रायक जय हे
भारतभाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे,
जय जय जय जय हे ।

हे गीत आणि त्याचा शब्दानुसार अर्थ –

**जनगणमन–अधिनायक जय हे भारतभाग्यविधाता ।**
**पञ्जाब सिन्धु गुजराट मराठा द्राविड़ उत्कल वङ्ग**
**विन्ध्य हिमाचल यमुना गङ्गा उच्छल जलधितरङ्ग**
**तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस मागे,**
**गाहे तव जयगाथा ।**
**जनगणमङ्गलदायक जय हे भारतभाग्यविधाता ।**
**जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।१।।**

**अर्थ** – समस्त भारतीय जनतेच्या मनावर अधिराज्य करणाऱ्या हे भारता भाग्यविधात्या, तुझा जयजयकार असो!

पंजाब, सिंध, गुजरात, महाराष्ट्र, द्रविडभूमी (दक्षिण भारत), ओरिसा, बं हे प्रदेश; विंध्य आणि हिमालयासारखे पर्वत; गंगा, यमुना या नद्या आणि सागरा उसळणाऱ्या जललहरी तुझाच जयघोष करीत तुझे आशीर्वाद मागतात.

सर्वांचे मंगल करणाऱ्या हे भारताच्या भाग्यविधात्या,
तुझा जयजयकार असो

**अहरह तव आह्वान प्रचारित, शुनि तव उदार वाणी**
**हिन्दु बौद्ध शिख जैन पारसिक मुसलमान खृस्टानी**
**पूरब पश्चिम आसे तव सिंहासन-पाशे,**
**प्रेमहार हय गाँथा।**
**जनगण-ऐक्यविधायक जय हे भारतभाग्यविधाता ।**
**जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।२।।**

अर्थ – तुझ्या प्रेमपूर्ण आव्हानाला प्रतिसाद देऊन तुझी उपदेशपर वाणी ऐकण्यासाठी आम्ही हिंदू, बौद्ध, शीख, जैन, पारशी, मुसलमान, ख्रिस्ती असे सर्व पूर्व आणि पश्चिमेचे, सर्व प्रेमहाराप्रमाणे एकमेकांना गुंफून तुझ्या सिंहासनापाशी जमलो आहोत. या सर्वांना एकत्र आणणाऱ्या हे भारताच्या भाग्यविधात्या, तुझा जयजयकार असो.

**पतन-अभ्युदय-बन्धुर पन्था, युग-युग धावित यात्री--**
**हे चिरसारथि, तव रथचक्रे मुखरित पथ दिनरात्रि ।**
**दारुण विप्लव-माझे तव शंङ्खध्वनि बाजे**
**संकटदुःखत्राता।**
**जनगणपथपरिचायक जय हे भारतभाग्यविधाता ।**
**जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।३।।**

अर्थ – या भारतीय जनतेची वाटचाल युगानुयुगे चालू आहे. तिचा प्रवास कधी वैभवाच्या शिखरावर, तर कधी दऱ्याखोऱ्यांतून चालला आहे. तू चिरसारथी असलेल्या तुझ्या रथचक्राच्या आवाजाने दिवस-रात्री दणाणून गेल्या आहेत. तू आमचा आक्रोश ऐकून आपला शंख फुंकून आमचे दुःखसंकटापासून रक्षण करण्यासाठी धावून येतोस. असे आम्हांला योग्य पंथाचे मार्गदर्शन करणाऱ्या आमच्या भाग्यविधात्या, तुझा जयजयकार असो.

**घोर तिमिरघन निविड़ निशीथे पीड़ित मूर्छित देशे ।**
**जाग्रत छिल तव अविचल मङ्गल नतनयने अनिमेषे ।**
**दुःस्वप्ने आतङ्के रक्षा करिले अङ्के**
**स्नेहमयी तुमि माता।**
**जनगणदुःखत्रायक जय हे भारतभाग्यविधाता ।**
**जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।४।।**

अर्थ – त्या काळरात्रीच्या घनदाट काळोखात जणू माझा देश मूर्च्छित झाला आहे. एका भयानक दुःस्वप्नात आम्ही गढून गेलो आहोत. अशा वेळी तूच त्याची स्नेहमयी माता झाला आहेस. त्याला मांडीवर घेऊन तू त्याचे संरक्षण करत आहेस. अशा आमच्या दुःखाचे निवारण करणाऱ्या हे भारताच्या भाग्यविधात्या, तुझा जयजयकार असो.

**रात्रि प्रभातिल, उदिल रविच्छवि पूर्व-उदयगिरिभाले,**
**गाहे विहङ्गम, पुण्य समीरण नवजीवनरस ढाले।**
**तव करुणारुणरागे निद्रित भारत जागे**
**तव चरणे नत माथा ।**
**जय जय जय हे, जय राजेश्वर भारतभाग्यविधाता ।**
**जय हे, जय हे, जय हे, जय जय जय, जय हे ।।५।।**

**अर्थ** – पण आता काळरात्र संपत आहे. पूर्वेच्या क्षितिजावर सूर्य उगवत अ पक्षी मंगलगीत गाऊ लागले आहेत. मंगल पहाट आमच्यामध्ये नवचैतन्य नि करते आहे. या तुझ्या प्रेमविश्वात हा निद्रिस्त भारत हळूहळू जागा होतो आहे अ तुझ्या चरणांवर मस्तक ठेवतो आहे. अशा या आनंदप्रसंगी हे सर्व राजांच्या रा भारताच्या भाग्यविधात्या, तुझा जयजयकार असो.

## भाग्यविधाता कोण?

'जन-गण-मन' चा शब्दश: अर्थ हा असा आहे. रवीन्द्रनाथांना अपे असणारा हा भारतभाग्यविधाता कोण? कारण पहिल्याच वाक्यात त्याचा उल्लेख आणि संपूर्ण गीत त्याचेच गुण गाणारे आहे. एका आवेगामध्ये या गीताची र झालेली असली, तरीही त्याची मांडणी ही सुविहित आणि सुनियोजित अ निश्चित काय सांगायचे आहे, यात कोणताही गोंधळ नाही. रवीन्द्रनाथ एकेश्वरवादावर विश्वास असल्याने तो जो जगन्नियंता आहे, त्याला उद्देशून हे आहे. तो जगन्नियंता या भूमीवरचा राजा नक्कीच नाही. तो या संपूर्ण सृष्टीचा नि आहे.

रवीन्द्रनाथांनी राजप्रशस्तिपत्राच्या विनंतीला नकार देऊन त्याला उत्तर म्हणू गीत लिहिले, त्यामागे विनंतिकर्त्यांविषयीचा संताप असला, तरीही या गीता रचनेवर त्याचा तसा परिणाम रवीन्द्रनाथांनी होऊ दिलेला नाही. **या देशाचा भाग्यवि ब्रिटिश राजा नव्हे, तर खुद्द ईश्वर आहे हे मी सांगतो. अशा स्पष्ट भावनेतून रवीन्द्रना या भारतभाग्यविधात्याचा विचार केला आहे.**

पहिल्या कडव्यात रवीन्द्रनाथ या भारतभाग्यविधात्याकडे आशीर्वाद मागणा त्याचे जयगान गाणाऱ्या देशाचे भौगोलिक वर्णन करतात. पंजाब, सिंध, गुजरा उत्तरेकडचा भाग; महाराष्ट्रासारखा भारताचा मध्यभाग; द्रवीड म्हणजे दक्षिण भा बंगाल, ओडिसा हे पूर्वेकडचे भाग. अशा देशाचे, येथील विंध्य-हिमाचलासा पर्वतांचे, गंगा-यमुनेसारख्या जीवनदायिनींचे केवळ नामोल्लेख कवी या पहि कडव्यात करतो.

एखाद्या राष्ट्राचे वर्णन करणे म्हणजे त्याची केवळ भौगोलिक रचना प

[illegible] त्याचा अर्थ नाही, हे कवीला चांगलेच माहिती होते. त्यामुळे या नंतरच्या कडव्यांमध्ये या देशाचे भौगोलिक उल्लेख कुठेही येत नाहीत. एखाद्या राष्ट्राचे वर्णन करणे म्हणजे त्याचा इतिहास, परंपरा, संस्कृती, विचारसरणी या सर्वांचा अभ्यास [illegible] हवा. कमीतकमी शब्दांत हे सगळे मांडणे अवघड असले, तरी अशक्य नाही. रवीन्द्रनाथांसारख्या शब्दप्रभूला तर ते सहजसाध्य होते. म्हणूनच पुढच्या कडव्यात ते इथल्या धर्मांकडे आणि त्यांच्यातील ऐक्यभावनेकडे वळतात. या देशाच्या पूर्व-पश्चिम दिशांत पसरलेले आणि या जगन्नियंत्याच्या चरणी अर्पण [illegible] प्रेमहारातील जणू फुले म्हणजेच येथील हिंदू, मुस्लीम, शीख, बौद्ध, पारशी या सर्व धर्मांचे लोक आहेत.

इंग्रजांचे येथील राज्य स्थिर झाल्यानंतर झालेल्या १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामात आणि १९०५ मध्ये झालेल्या बंगालच्या फाळणीविरुद्धच्या आंदोलनात हिंदू-मुस्लिमांनी एकजूट दाखवली होती. हे ऐक्य रवीन्द्रनाथांच्या मनात ठसले होते. या ऐक्याला सुरुंग लावण्याच्या इंग्रजांच्या हेतूला केवळ बंगवासीयांनीच नाही, तर संपूर्ण भारतातील जनतेने ऐक्य दाखवून सडेतोड उत्तर दिले होते. मुस्लीम लीगची स्थापना झाली असली, तरी त्या विषवृक्षाची छाया त्यावेळी कदाचित रवीन्द्रनाथांना जाणवली नसेल. म्हणूनच या सर्वांना एकत्र ठेवणाऱ्या भाग्यविधात्याचा ते पुन्हा पुन्हा जयजयकार करतात.

वर्षानुवर्षे या उज्ज्वल संस्कृतीच्या आणि परंपरेच्या वाटेवरून येथील जनतेचा प्रवास अखंड चालू आहे. या वाटेत कधी वैभवाची शिखरे येतात, तर कधी संकटांच्या दऱ्या! या देशावर सतत झालेली आक्रमणे मग ती कधी राजकीय तर कधी सांस्कृतिकही. पण या 'पतनातून' अभ्युदय प्राप्त करण्यासाठीच आपल्या पराक्रमाने या देशाला इथल्या वीरांनी तारले आहे. अशा वेळी हाच भाग्यविधाता शंख फुंकून या देशवासीयांचे, या यात्रेकरूंचे रक्षण करण्यासाठी युद्धसज्ज होत धावतो.

या तिसऱ्या कडव्यानंतर रवीन्द्रनाथ भूतकाळातून वास्तवाकडे येतात. आज या देशवासीयांची अवस्था जणू मूर्च्छित पडल्यासारखी आहे. पारतंत्र्याच्या दुःस्वप्नांनी त्यांना वेढून टाकले आहे. इंग्रजांच्या आगमनानंतर जणू इथे काळरात्रच झाली आहे. इथले वैभव इंग्रजांच्या व्यापारी धोरणामुळे साफ धुवून नेले आहे.

या देशातील जनतेला पारतंत्र्याची सवयच तर झाली नाही ना? की इंग्रजांच्या मायाजालाने हा देश जणू मूर्च्छित झाला आहे? अशा वेळी हा भाग्यविधाता मातेच्या प्रेमाने या देशवासीयांना उचलून घेत आहे. संकटांपासून त्यांचे संरक्षण करत आहे. इथे रवीन्द्रनाथ या देशावरील संकटांच्या मालिकांमध्ये, दुःखांमध्ये गुंतून पडत नाहीत. आजच्या पारतंत्र्याच्या वर्तमानात त्यांना उद्याचा आशादायक भविष्यकाळ दिसतो आहे. तो भविष्यकाळ त्यांना हा भाग्यविधाताच दाखवतो आहे. ही काळरात्र

संपून पूर्वेला सूर्य उगवत आहे आणि अशा पहाटेच्या वेळी त्या भाग्यविधात्याच चरणांवर सारा भारत मस्तक ठेवून त्याच्या प्रेमविश्वात सामावून जातो आहे. ज सर्व राजांचा राजा असा राजराजेश्वर असणारा तो जगन्नियंता भारताचा भाग्यविधा त्याचा जयजयकार रवीन्द्रनाथ साऱ्या भारतवासीयांच्या वतीने करतात.

ही संपूर्ण कविता एका वेगळ्या दृष्टीने पाहिल्यानंतर रवीन्द्रनाथांचा हा भाग्यविधा कोण, हे समजू लागेल. रवीन्द्रनाथांच्या इतर कविता व वाङ्मय पाहिल्यानंतर या उलगडा होऊ लागतो. रवीन्द्रनाथांच्या अनेक कवितांमध्ये असे नामविरहित व्यक्तिम डोकावते. ते जगन्नियंता किंवा जगाचे नियंत्रण करणारी शक्ती अशा स्वरूपात आहे. केवळ 'जन-गण-मन'मध्येच ते व्यक्तिमत्त्व आले आहे असे नव्हे.

'जन-गण-मन' लिहिण्यापूर्वी १९१० च्या जुलैमध्ये रवीन्द्रनाथांनी 'भारत तीर्थ' नावाची एक कविता लिहिली. ज्याप्रमाणे बंकिमचंद्रांचे 'वन्दे मातरम्' लिहिण्याप लिहिलेला 'आमार दुर्गोत्सव' हा लेख व त्यातील 'जय जय जय बंग जगदात्री' गीत हे 'वन्दे मातरम्'चेच पूर्वरूप होते, त्याचप्रमाणे 'भारत-तीर्थ' ही कविता 'ज गण-मन'चे पूर्वरूप मानता येईल. या कवितेतही रवीन्द्रनाथांनी भारतवर्षाची ए शुभमूर्ती कल्पिली आहे.

**हे मोर चित्त, पुण्य तीर्थे जागो रे धीरे –**
**ऐअि भारतेर महामानवेर सागरतीरे ।**
**हेथाय दाँडाए दु बाहु बाड़ाए नमि नरदेबतारे,**
**उदार छंदे, परमानन्दे बन्दन करि ताँरे ।**
**ध्यानगंभीर ऐअि–जे भूधर, नदीजपमाला धृतप्रान्तर,**
**हेथाय नित्य हेरो पवित्र धारित्रीरे**
**ऐई भारतेर महामानवेर सागरतीरे ।**
**केह नाहि जाने कार आह्वाने कत मानुषेर धारा**
**दुर्वार स्रोते ऐल कोथा हते, समुद्रे हल हारा ।**
**हेथाय आर्य, हेथा अनार्य, हेथाय द्राविड, चीन–**
**शक–हून–दल, पाठान–मोगल एक देहे हल लीन ।**
**पश्चिम आजि खुलियाछे द्वार, सेथा हते सबे आने उपहार**
**दिवे आर निबे, मिलाबे मिलिबे जाबे ना फिरे–**
**ऐअि भारतेर महामानवेर सागरतीरे ।**
**रणधारा बाहि जयगान गाहि उन्माद कलरवे**
**भेदि मरुपथ गिरिपर्वत जारा ऐसेछिल सबे,**
**तारा मोर माझे सबाई बिराजे केह नहे नहे दूर,**
**आमार शोणिते रयेछे ध्वनिते तारि बिचित्र सुर ।**

हे रुद्रवीणा, बाजो बाजो बाजो, घृणा करि दूरे आछे जारा आजओ,
बन्ध नाशिबे, ताराओ आसिबे, दाँडाबे घिरे–
आजि भारतेर महामानवेर सागरतीरे ।
हेथा एकदिन विरामविहीन महा ॐकारध्वनि
हृदयतन्त्रे एकेर मंत्रे उठेछिल रनरनि
तपस्याबले एकेर अनले बहुरे आहुति दिया
विभेद भुलिल, जागाये तुलिल एकटि विराट हिया ।
सेई साधनार से आराधनार यज्ञशालार खोला आजि द्वार,
हेथाय सबारे हबे मिलिबारे आनतशिरे–
आजि भारतेर महामानवेर सागरतीरे ।
सेई होमानले हेरो आजि ज्वले दुखेर रक्त शिखा,
हबे ता सहिते, मर्मे दहिते – आछे से भाग्ये लिखा ।
ए दुखवहन करो मोर मन, शोनो रे एकेर डाक ।
जत लाज भय करो करो जय, अपमान दूरे जाक ।
दुःसह व्यथा हये अबसान जन्म लभिबे की विशाल प्राण
पोहाय रजनी, जागिछे जननी विपुल नीड़े
आजि भारतेर महामानवेर सागरतीरे ।
एसो हे आर्य, एसो अनार्य हिन्दु–मुसलमान ।
एसो एसो आज तुमि इंराज, एसो एसो खृस्टान ।
एसो ब्राह्मन, शुचि करि मन, धरो हाथ सबाकार ।
एसो हे पतित, करो अपनीत सब अपमानभार ।
मार अभिषेके एसो एसो त्वरा, मंगलघट हय नि जे भरा
सबार–परशे–पवित्र–करा तीर्थनीरे
आजि भारतेर महामानवेर सागरतीरे ।

हे माझ्या चित्ता, भारतवर्षामध्यें मनुष्यांच्या महाजातींचा जो सागर उसळत आहे, याच्या तीरावरच्या महान् पुण्यतीर्थाचे ठिकाणीं धीरपणें जागें हो.

येथें मानवसागराच्या तीरावर उभें राहून, आपले दोन्ही बाहू पसरून मी नरदेवतेला, या मानवी नारायणाला नमस्कार करतों आणि परम आनंदानें माझा गंभीर राग आळवून याला वंदन करतों.

हा पहा येथें हिमालयासारखा ध्यानगंभीर पर्वत, नदीरूपी अनेक जपमाला हातांत धरून एका सरहद्दीवर आसन ठोकून बसला आहे. येथें या महामानवाच्या सागरतीरीं भारतवर्षाची पवित्र भूमि तूं पहा, तूं नेहमीं पहा.

कांहीं समजत नाहीं, कुणाच्या आमंत्रणानें कितीतरी मनुष्यजातीचें प्रवाह कुठून

तरी येथें आपापले लोंढे घेऊन आले आणि या महासमुद्रामध्यें मिळून लुप्त झा
आहेत, येथें पहावें तो हे आर्य आहेत, अनार्य आहेत, हे द्रावीड आणि चीन, श
आणि हूण, पठाण आणि मोगल तऱ्हेतऱ्हेच्या भिन्न आणि विचित्र जाती येऊन
एकदेहामध्ये विलीन झाल्या आहेत - एकजीव झाल्या आहेत.

आज आतां या देशाचें पश्चिमेकडचे द्वार उघडलें गेलें आहे आणि सर्वजण ये
तऱ्हेतऱ्हेच्या देणग्या आणीत आहेत. हे सर्व लोक येतील, देतील आणि घेती
मिसळतील आणि मिसळवतील, कोण-कोणीहि-परत जावयाचें नाहींत. ते सर्व
भारतरूपी महासागराच्या तीरीं कायमचे गोळा झाले आहेत.

जें लोक एकेकाळी रणनदीचा प्रवाह वाहवीत आणि उन्मादानें कलरव क
जयगान गात आले, मरुपथ भेदून, गिरिपर्वत ओलांडून दूरदुरून जें कोणी आले
सर्व आज माझ्यांतच विराजत आहेत. त्यांपैकी कोणीहि दूर होणार नाहीं. अ
आमच्या रक्तांत त्या सर्वांचे तऱ्हेतऱ्हेचे सूर एखाद्या संपूर्ण रागाप्रमाणें गुंजत आहे

हे माझे रुद्रवीणे, त्या सर्वांचे हे विचित्र सूर तुला ठाऊक आहेत. भारतवर्षा
इतिहासाच्या रहस्याचें तुला आकलन झालें आहे. तूं गर्जना कर, घोषणा कर,
जगाला तुझा उद्‌घोष ऐकीव कीं जे कोणी आमची घृणा करून, आमचा तिरस्
करून दूर राहतात ते सर्व आमचीं आणि त्यांचीं बंधनें नष्ट झाल्यावर आमच्याज
येतील आणि भाऊ म्हणून आम्हाला घेरतील. भारतवर्षरूपी महामानवाच्या सागरत
ते सर्व महामानव-संमेलनांत सामिल होणार आहेत.

हे सर्व यदृच्छेनें कांहीं तरी घडत आहे असें नाहीं. भारतभाग्यविधा
नारायणानें भारतवर्षाच्या जन्मकाळींच हें भविष्य भाकून ठेविलें आहे. भ
जातीला तिच्या उपनयन काळीच प्रणवमात्रांबरोबर ही सर्वात्मैक्याची-पूर्णत
दीक्षा मिळाली होती.

येथें एके दिवशीं अविरत महा ॐकारध्वनि ऐक्याचा मंत्र गात गात, हृदयतंत्री
सर्व तारा छेडत गुंजन करीत उठला होता आणि त्याबरोबर भारतवर्षानें आप
तपस्याबलानें एकत्वाच्या होमकुंडांत नानात्वाची आहुति देऊन विभेदाचा नाश क
टाकला आणि त्यायोगें एक विराट हृदय जागृत होऊन विश्वात्मैक्याची स्फुरणा स
लागली. त्याच साधनेच्या आणि त्याच आराधनेच्या यज्ञशालेंचे द्वार आज
उघडलें गेलें आहे. आज येथें सर्वच नम्रतेनें शिर वांकवून एकत्र होण्यासाठी ये
आहेत. भारतवर्षरूपी महामानवाच्या सागरतीरीं त्यांचा यज्ञवृंद गोळा होणार अ

पहा, त्याच होमाग्नीमध्यें दुःखाची रक्तशिखा आज जोरानें पेट घेत आहे.
जें भाग्यांत लिहिलें गेलें होतें त्याप्रमाणें हे सर्व सहन केलें पाहिजे. आणि अ
मर्मापर्यंत होरपळून घेतलें पाहिजे. हे माझ्या चित्ता, हे माझ्या हृदया, धैर्यपूर्व
दुःख सहन कर आणि ऐक्याचें तें आमंत्रण, ऐक्याची ती हांक ऐकण्याची पात्रता
करून घें. हृदयांत जीं काहीं लाज, भीती कानाकोपऱ्यांत उरली असेल तिच

[illegible] [illegible] अपमान दूर सार. म्हणजे तुझ्या दुःसह व्यथेचा अंत होईल आणि [illegible] [illegible] विशाल प्राण तुझ्यामध्यें जन्म घेईल. रात्र संपली आहे आणि या विशाल [illegible] भारतजननी जागृत झाली आहे. आतां तिच्या महामानवरूपी सागरतीरावर [illegible] [illegible] होणार आहेत.

हे आर्यांनो आणि हे अनार्यांनो, हे हिन्दु आणि मुसलमानांनो, या, या, धांवत [illegible] आणि इंग्रजा, तूंहि ये. प्रत्येक ख्रिस्त्या, तूंहि ये, जरूर ये.

[illegible] ब्राह्मणा, सर्व प्रकारची संकुचितता सोडून, अभिमान सोडून आपलें मन [illegible] [illegible] ये आणि सर्वांच्या हातांत हात घालून उभा रहा. आणि हे पतिता, तुझा [illegible] अपमानभार दूर होवो. तूंहि येथें ये.

मातेच्या अभिषेकासाठी तुम्ही सर्व धांवत या. अभिषेकाचा मंगलघट जोंवर पूर्ण [illegible] नाहीं तोवर त्वरा करून या. सर्वांच्या स्पर्शानें पवित्र झालेल्या तीर्थनीरानें हा [illegible] [illegible]वयाचा आहे. आज भारतवर्षाच्या महामानवाच्या सागरतीरीं विश्वजननीचा अभिषेक व्हावयाचा आहे. मनुष्यजातींमध्यें बंधुता स्थापन झाल्याचा महोत्सव [illegible] आहे. यासाठीं सर्वजण धांवून या. कारण या अभिषेकघटाला सर्वांचा हात [illegible] पाहिजे.'' (रवींद्र-झंकार, रवींद्रनाथ टागोरांच्या ४३ बंगाली गीतांचें मनन व भाषांतर, [illegible] कालेलकर, पृष्ठ - १२४ ते १२६)

हे संपूर्ण गीत व त्याचा उत्तम मराठी भावाविष्कार पाहिल्यानंतर रवीन्द्रनाथांची 'जन-गण-मन' लिहिण्यापूर्वीची मनस्थिति समजू शकते. 'जन-गण-मन'मध्ये आलेली [illegible] [illegible] शक्ती रवीन्द्रनाथांच्या चित्तामध्ये, मनामध्ये किती प्रबळ प्रमाणात होती, ते या गीतातून स्पष्ट समजते.

'जन-गण-मन'मध्ये आलेले 'जन-गण ऐक्यविधायक जय हे, [illegible]विधाता' या आशयाचे शब्द या 'भारततीर्थ' कवितेतही आहे. या कवितेतले [illegible] कडवे मातेच्या, विश्वजननीच्या अभिषेकासाठी सर्वांना येण्याचे आवाहन [illegible] आहे. मनुष्यजातीमध्ये बंधुता निर्माण व्हावी, असा या कवितेतील आशावाद 'जन-गण-मन'मध्येही प्रतिबिंबित झाला आहे.

त्याच सुमारास रवीन्द्रनाथांची 'गोरा' ही कादंबरी प्रकाशित झाली. ही कादंबरी [illegible] खूप गाजली. या संपूर्ण कादंबरीत रवीन्द्रनाथांनी ही तत्त्वप्रणाली सूचित केली आहे. ही तत्त्वप्रणाली एकेश्वरवादाच्या जवळ जाणारी आहे. या कादंबरीच्या शेवटी 'गोरा' म्हणजे कादंबरीचा नायक म्हणतो, 'मी आज भारतवर्षीय झालो. माझ्यामध्ये हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती असा कोणत्याही समाजाचा कसलाही विरोध उरलेला नाही. या सर्व भारतवर्षाची जात ती माझी जात. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, ब्राह्मण या सर्वांचा जो ईश्वर, त्या ईश्वराची मंत्रदीक्षा तू मला दे. तो केवळ हिंदूंचाच ईश्वर नाही, सगळ्या भारतवर्षाचा आहे.'

'जन-गण-मन' लिहिण्यापूर्वी जी तत्त्वप्रणाली रवीन्द्रनाथांच्या मनात आक घेत होती, तीच तत्त्वप्रणाली १९१० मधल्या त्यांच्या या कवितेतून व 'गोरा' कादंबरीतून प्रकट झाली आहे. तीच विचारधारा पुढे 'जन-गण-मन'मधून प्रतिबिं झाली. फक्त त्याला निमित्त मात्र पंचम जॉर्जचे स्वागतगीत लिहिण्याचे आव्हान ठरले. रवीन्द्रनाथांच्या इतर कोणत्याही साहित्यामध्ये ब्रिटिश राजसत्तेची स्तुती कि राजघराण्याचा उल्लेख दिसत नाही. रवीन्द्रनाथांची वृत्ती जर इंग्रज स्तुतिपाठका असती, तर ती केवळ 'जन-गण-मन' या एकाच गीतातून प्रतिबिंबित कशी झा असती? त्याचे पडसाद त्यांच्या इतर साहित्यामध्येही दिसायला पाहिजे होते.

## कवितेचा आशय व टीकाकारांच्या दृष्टीने दिशाभूल करणारे श

आपल्याकडे मराठीत अनेक संतांच्या रचना या कूट रचना मानल्या जात शब्दशः दिसणारा अर्थ वेगळा आणि त्याचा अधिक आध्यात्मिक मोजमापे ल विचार केला तर वेगळा अर्थ त्यात जाणवतो. अशा काहीशा वेगळ्या रचना के मराठीतच नव्हे, तर संस्कृतमध्येही दिसतात.

ही रचना याच परंपरेतील आहे. त्यात गूढता नसली, तरी काही शब्दां त्यातून रवीन्द्रनाथांना अपेक्षित असलेल्या अर्थापेक्षा आणखी काही वेगळा निघतो. रवीन्द्रनाथांनी हे दिशाभूल व्हावी म्हणून नक्कीच केले नाही. कारण काही शब्दांच्या वापरामुळे हा भाग्यविधाता जणू पंचम जॉर्ज आहे, असा विरोधकांनी काढला, त्याचे स्पष्टीकरण एरवी रवीन्द्रनाथांनी केलेही नसते. कव अपेक्षित असणाऱ्या अर्थापेक्षा वेगळा अर्थ टीकाकारांनी, विरोधकांनी आप सोयीनुसार लावून या कवितेला राजप्रशस्तीचे रूप दिले. याचेच दुःख रवीन्द्रना अधिक झाले. राजप्रशस्तिपर गीत लिहिण्यास नकार देऊन त्या उद्वेगात लिहिले गीतालाच राजप्रशस्तिगीताचे स्वरूप टीकाकारांनी द्यावे, याहून दुःखाची गोष्ट क दुसरी कोणती असणार?

'जन-गण-मन'च्या पहिल्या दोन कडव्यांत आक्षेपार्ह काहीच नाही. इथ भौगोलिक परिस्थितीचे, इथल्या धर्मांचे उल्लेख यात आहेत. परंतु दुसऱ्या कडव्य शेवटच्या दोन ओळींमध्ये टीकाकारांना पंचम जॉर्ज दिसू लागतो.

आकाराने अतिशय छोट्या अशा इंग्लंडसारख्या देशाने जगातल्या बहुतेक खंडांतल्या वेगवेगळ्या देशांवर दीर्घकाळ राज्य केले. 'आमच्या साम्राज्यावरील कधीही मावळत नाही', असे काहीशा गर्वाने इंग्रज जे म्हणत असत, त्यात प्रमाणात तथ्यही होते. त्यामुळे दुसऱ्या कडव्यातील तिसऱ्या ओळीत 'पूरब आसे, तव सिंहासन पाशे' हे शब्द पूर्वेपासून पश्चिमेला पसरलेल्या इंग्रजी राजव सिंहासनाधीश्वर पंचम जॉर्ज याला उद्देशून आहे, असे वरवर पाहता वाटते आणि

तसेच पुढच्या कडव्यातील ओळीही पूरक आहेत असे वाटतात.

**पतन-अभ्युदय-बन्धुर पन्था,**

**युग-युग धावित यात्री -**

**हे चिरसारथि, तव रथचक्रे मुखरित पथ दिनरात्रि ।**

**दारुण विप्लव-गाजे तव शङ्खध्वनि**

**बाजे संकटदुःखत्राता।**

या पंचम जॉर्जचे राजघराणे राजसिंहासनावर आरूढ होऊन वर्षानुवर्षे राज्य करीत आहे. हे राजघराणे म्हणजे ह्या कालरथाचा जणू चिरसारथी आहे व हा चिरसारथी जनतेचे दुःख निवारण करण्यासाठी मुद्दामहून येत आहे, असा बंगालची फाळणी रद्द करण्यासाठी भारतात आलेल्या पंचम जॉर्जशी या ओळींचा संबंध जोडता येतो.

रवीन्द्रनाथांनी यात उल्लेख केलेला रथ किंवा चिरसारथी हा इंग्लंडच्या बादशहा-व्यतिरिक्त अन्य कोणी असूच शकत नाही का? हा विचार टीकाकारांनी केलाच नाही. पण हे शब्द त्या जगाचे नियंत्रण करणाऱ्या शक्तीला उद्देशून असू शकतात. प्रकाश घेऊन येणारा दिवस ज्याच्या आगमनाने सुरू होतो, तो सूर्यदेवही रथातून येतो. श्रीमत्भगवद्गीतेतही भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाच्या रथाचे सारथ्य करून त्याला विजय प्राप्त करून दिला होता. 'युग युग धावित यात्री' अशी यात्रा करणारे कोण? जे भगवंताकडे भक्तीच्या मार्गाने जातात, ते यात्रेकरू किंवा यात्री. सम्राटाकडे, राजाकडे लाचार भावनेने जाणाऱ्या जनांना यात्रेकरू म्हणत नाहीत. तिसऱ्या ओळीतला 'दारुण विप्लव' म्हणजे घनघोर क्रांती. इथे क्रांती म्हणजेच इंग्रजांविरुद्ध चालू असलेला स्वातंत्र्याचा लढा व त्याच्याच पुढच्या शब्दांत 'तव शंखध्वनी बाजे' म्हणजे पूर्वी युद्धाची सुरुवात शंखध्वनीनेच केली जाई. भगवान श्रीकृष्णानेही महाभारत युद्धाची सुरुवात 'पांचजन्य' च्या शंखध्वनीने केली होती. पाठोपाठ भीमाने 'पौंड्र', युधिष्ठिराने 'अनंतविजय', नकुलाने 'सुघोष' व सहदेवाने 'मणिपुष्पक' या शंखांचा नाद केला, असे वर्णन गीतेत आढळते.

इथे आपले युद्ध ब्रिटिश सत्तेशी होणार आहे, या मार्गावर आपल्याला सर्वस्वाचा त्याग करावा लागणार आहे, अशा प्रसंगी जी संकटे, दुःखे येतील, त्यावेळी तो भारतभाग्यविधाता, ती ईश्वरी शक्तीच आम्हाला मार्ग दाखवणार आहे. रवीन्द्रनाथांच्या कल्पनेतील चिरसारथी हा स्वतःच दुःख देऊन ते निवारण करण्यासाठी येणाऱ्या पंचम जॉर्जप्रमाणे ढोंगी नाही.

तिसऱ्या कडव्यातील या ओळींनीच टीकाकारांची दिशाभूल केली आहे. रवीन्द्रनाथांना अपेक्षित असणारा हा अर्थ ते समजून घेऊ शकले नाहीत व रवीन्द्रनाथांवर केवळ टीका करीत राहिले.

चौथ्या कडव्यात रवीन्द्रनाथ या भारतभाग्यविधात्याला मातेच्या स्वरूपात पाहतात.

पारतंत्र्यामुळे ही जनता जणू मूर्च्छित झाली आहे. 'एका भयानक, दुःस्वप्न पडलेल्या आम्हाला तू स्नेहमयी माता होऊन मांडीवर घेतले आहेस व आमचे दु निवारण करत आहेस.' मातेचे असे प्रेमळ स्वरूप रवीन्द्रनाथ पाहतात, त्यांचे साहजिकच 'वन्दे मातरम्' या शब्दांची आठवण होते. माता हे जगातील सर्वो प्रेमाचे प्रतीक असल्यामुळे एरवी हे गीत पितृगीत असतानाही हा पितासुद्धा या अत दुःखाच्या प्रसंगी आपल्या पुत्रांवर मातेच्या ममतेने प्रेमाचा वर्षाव करतो आहे, त्य धीर देतो आहे, असे म्हणण्याचा मोह रवीन्द्रनाथांनाही टाळता आला नाही. इथे माता म्हणजे काहीजणांना पंचम जॉर्जच्या मातोश्री मेरी वाटतात. परंतु या ओळी वाचल्या, तर असा विचार रवीन्द्रनाथांच्या मनात असणेही शक्य नाही, याची ख पटते. रवीन्द्रनाथांनी 'आमार सोनार बांगला' या गीतातही मातृभूमी या अर्थाने हा शब्द वापरला आहे. हे गीत पुढे बांगलादेशचे राष्ट्रगीत झाले. अज्ञानाच्या ग बुडालेले आम्ही दारिद्र्याने गांजले आहोत, अशा वेळी मूर्च्छित झालेल्या आ भक्तांना स्नेहमयी मुद्रेने पाहणारी ती माता कदाचित दुर्गाही असू शकते; क बंगाल हा प्रामुख्याने दुर्गापूजकांचा प्रदेश. खुद्द रवीन्द्रनाथही दुर्गोत्सवात उत्सा सामील होत. परंतु असे कोणतेही अर्थ न घेता टीकाकारांनी आपल्या टीकेचा प्र रवीन्द्रनाथांच्या तथाकथित राजनिष्ठेकडे वळवला आहे.

शेवटच्या कडव्यात या कवितेचा समारोप करताना ते म्हणतात,

**रात्रि प्रभातिल, उदिल रविच्छवि पूर्व–उदयगिरिभाले,**
**गाहे विहङ्गम, पुण्य समीरण नवजीवनरस ढाले,**
**तव करुणारुणरागे निद्रित भारत जागे**
**तव चरणे नत माथा ।**
**जय जय जय हे, जय राजेश्वर भारतभाग्यविधाता ।**

या संपूर्ण काव्याला एक आध्यात्मिक किनार आहे. सृष्टी निर्माण करणारी एक शक्ति आहे, तिला देव, अल्ला, ख्रिस्त, बुद्ध कोणी काहीही म्हणा, त्या शक अस्तित्व आध्यात्मिक विचारांवर विश्वास असणारा कोणताही भारतीय मा नाकारत नाही. अशाच एका शक्तीला रवीन्द्रनाथांनी जगन्नियंत्याच्या स्वरू बघितले. ही शक्ति आम्हाला देशवासीयांना पारतंत्र्यातून मुक्त होण्यासाठी लढ शक्ती देईल आणि आजची ही पारतंत्र्याची काळरात्र संपून उद्या स्वातंत्र्याचा उष होईल, तेव्हा पूर्वेकडून उगवणाऱ्या या सूर्यदेवाच्या रूपात आम्हाला आमच्या भाग्यविधात्याचे दर्शन होईल, असे रवीन्द्रनाथांना सुचवायचे होते.

रवीन्द्रनाथ 'असेल माझा हरी' अशा वृत्तीचे कधीच नव्हते. आयुष्य शेवटच्या क्षणापर्यंत ते वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये सतत प्रयोग करत राहिले. कवित माध्यमात, शिक्षणाच्या माध्यमात, चित्रकलेच्या प्रांतात त्यांनी केलेले प्रयोग

[illegible] ठरले. हे प्रयोग करत असताना ते स्वत:ला सतत तपासत राहिले. वडील देवेन्द्रनाथांच्या ऋषितुल्य वर्तणुकीचा अंश रवीन्द्रनाथांमध्येही आला होता. एखाद्या प्राचीन गुरुकुलातील आचार्यांप्रमाणे त्यांचे व्यक्तिमत्त्व घडले गेले. त्यामुळे विश्वाचे [illegible] करणारी एखादी शक्ती अचानक चमत्कार करून या देशाचे भवितव्य [illegible], अशी भाबडी आशा रवीन्द्रनाथांना नक्कीच नव्हती. या निद्रिस्त भारताला जागे करून स्वातंत्र्य मिळवण्याच्या दृष्टीने प्रयत्न करण्याची शक्ती कोणी देईल, असा विश्वास मात्र त्यांना असावा. पारतंत्र्याच्या अंधकारातून बाहेर पडण्यासाठी प्रकाशाची वाट आपल्या जनतेनेच शोधली पाहिजे. या गीताच्या सर्वांत शेवटच्या ओळीत जो [illegible] हा उल्लेख आहे, तो राजेश्वर म्हणजे एका मर्यादित भूभागावर राज्य करणारा कोणी राजा नसून या संपूर्ण जगाचे, पृथ्वीचे नियंत्रण करणारा शक्तिस्वरूप अनामिक तो आहे, असे सुचवून रवीन्द्रनाथांनी या एका अत्यंत वेगळ्या वाटेने जाणाऱ्या गीताचा सार्थक समारोप केला आहे.

प्रा. वि. म. बेडेकर आपल्या लेखाचा समारोप करताना या गीताचा आणि रवीन्द्रनाथांचा यथार्थ गौरव करताना लिहितात,

'रवीन्द्रनाथांच्या जीवनदृष्टीत औपनिषदिक ब्रह्मवाद आणि आधुनिक मानवतावाद यांचा मधुर समन्वय झालेला असून तो त्यांच्या उज्ज्वल प्रतिभेच्या मुशीतून अत्यंत [illegible] प्रकट झाला आहे. उपनिषदांतून वर्णिलेला विश्वाचा जो अंतर्यामी, त्याचा साक्षात्कार समाजापासून दूर राहणाऱ्या निवृत्तिमार्गाने होत नसतो, तो साक्षात्कार [illegible] समाजात, मानवी प्रवृत्तींत, मानवाच्या प्रज्ञेत व सर्जनशीलतेत, त्याच्या सौंदर्यान्वेषिणी दृष्टीत आणि माधुर्य, करुणा, शांती या मानवी गुणांतून होत असतो, असे रवीन्द्रनाथांचे जीवनदर्शन संक्षिप्तपणे सांगता येईल. परतंत्र भारताचे, अज्ञानात, दारिद्र्यात, पारतंत्र्याच्या शृंखलेत खितपत पडलेल्या जनतेचे चित्र पाहून त्यांच्या कारुण्यपूर्ण, भावनातरल चित्ताला दारुण व्यथा होणे अपरिहार्य होते. त्यांची देशभक्ती उत्कट होती. मवाळांच्या 'भिक्षां देहि' वृत्तीचा त्यांनी आपल्या तेजस्वी लिखाणातून निषेध केलेला आहे. वंगभंगाविरुद्ध झालेल्या आंदोलनात त्यांनी अरविंदांच्या बरोबरीने पुढाकार घेतला होता. त्यांची उत्स्फूर्त देशभक्तिपूर्ण गीते लोकांच्या तोंडी कशी खेळू लागली व त्यामुळे बंगालमध्ये जनजागृती कशी घडून आली, या गोष्टी रवीन्द्रनाथांच्या चरित्राच्या अभ्यासकांना सुपरिचितच आहेत. परंतु त्याचबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, त्यांची देशभक्ती संकुचित स्वरूपाची नव्हती. ती मानवतावादाचे व विश्वबंधुत्वाचे एक साधन होती. महामानवाच्या सागरतीरावरील भारत हे एक त्यांना सुपरिचित असे अत्यंत जवळचे 'तीर्थ' होते. रवीन्द्रनाथांच्या दृष्टीने 'भारतभाग्यविधाता' हा 'मानवभाग्यविधात्या'चीच एक विभूती, एक जवळचे सगुण स्वरूप होते. देशभक्तीच्या अशा विशाल पण उत्कट स्वरूपाचे संयत दर्शन आपणास 'जन-गण-

मन' या गीतातून घडते. भारतीय संस्कृतीबद्दलची आत्मीयता, भारतातील वि
मानवसमाजांवरील गाढ प्रेम, विपन्न, निद्रिस्त, परतंत्र भारताबद्दलची व्याकुळ
भारताच्या उन्नतीबद्दलची दुर्दम्य आशा, भारतभाग्यविधात्यावरील निस्सीम श्र
इत्यादी भावभावना या राष्ट्रगीतातून संयतपणे प्रतीत होतात :

''भारतातील विविध धर्मांचे समाज - हिंदू, बौद्ध, शीख, जैन, मुसलम
पारशी, ख्रिस्ती - पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील - दोन्हीही दिशांकडील स
एकत्र येऊन, प्रेमहार गुंफून जनगणऐक्यविधायक अशा भारतभाग्यविधात्या
सिंहासनासापाशी उभे आहेत. भारतीय संस्कृतीचा प्राचीन मार्ग पतन-अभ्यु
उत्कर्ष-अपकर्ष यांनी ओबडधोबड झालेला (बन्धुर) असून, त्यावरून युगानुयु
असंख्य यात्रिकांचे रथ वेगाने गेले आहेत, जात आहेत, जाणार आहेत. त
सारथ्य करणारा मार्गदर्शक भारतभाग्यविधाता - ज्याचा धीर देणारा शंखघोष व
आहे - तो संकटांतून, दुःखांतून रक्षण करील. घोर निबिड अंधारात मूर्च्छित हो
पडलेला आपला देश हळूहळू जागृतावस्थेत येत आहे. दुःस्वप्ने व भीती यांनी
होऊन खाली पडलेल्या भारताकडे भारतभाग्यविधाता अनिमिष, स्नेहपूर्ण नय
पाहत असून, तो स्नेहमयी मातेप्रमाणे त्याला आपल्या अंकावर घेऊन त्या
दुःखाचे निवारण करील. रात्र संपून पहाट झाली आहे. पूर्व-उदयगिरीचे
रवितेजाने उजळत आहे. विहंगम गात आहेत. पुण्य समीरण नवजीवनाचे सि
करीत आहे. निद्रिस्त भारत जागा होत आहे आणि आपल्या त्या भाग्यविध
राजराजेश्वराच्या करुणारुण रागाच्या प्रभेत त्याला प्रणाम करीत आहे.''

यापेक्षा अधिक स्फूर्तिप्रद आणि उदात्त आशय कोणता असू शकेल?' (भा
राष्ट्रगीताचा रचनाकालीन व नंतरचा संक्षिप्त इतिहास : प्रा. वि. म. बेडेकर, नवभारत - जा
१९५८)

रवीन्द्रनाथांच्या सर्वच काव्यरचनेत एक विलक्षण नादमाधुर्य आणि त्या पाठो
येणारा ताल आहे. स्वत: रवीन्द्रनाथ उत्तम संगीतकार असल्यामुळे या दोन्ह
समन्वय अत्यंत सहजपणे त्यांच्या काव्यात साधला गेला आहे. हे सारे कौश
त्यांच्या शब्दरचनेमध्ये आहे. पण ह्या इतर काव्यांपेक्षा 'जन-गण-मन' ह्या काव्या
या सर्वांचा अधिकच चांगला संगम साधलेला दिसतो. 'रवीन्द्रनाथांच्या सर्व कृ
विचार आणि भावना यांचा उत्कर्ष असतो.' असे काकासाहेब कालेलकर
'रवीन्द्र-झंकार' या त्यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहिले होते. 'जन-गण-
ह्या काव्यामध्ये या जगन्नियंत्या, राष्ट्रन्नियंत्या शक्तीबद्दल असलेली नितांत
आणि दुसरीकडे ही शक्ती त्या पंचम जॉर्जपेक्षाही अधिक श्रेष्ठ आहे, असे रवीन्द्रना
सहजपणे सांगितले आहे म्हणूनच हे कार्य चिरस्थायी स्वरूपाचे असे झाले अ

# ‘जन-गण-मन’वरील आक्षेपांबाबत रवीन्द्रनाथांची प्रतिक्रिया

एक राजप्रशस्तिगीत म्हणून ‘जन-गण-मन’वर घेण्यात आलेला आक्षेप हा सुरुवातीच्या काळात बंगालमध्ये प्रामुख्याने साहित्यिक वर्तुळापुरता मर्यादित होता. मौखिक स्वरूपात या टीकेचा प्रसार पुढे वाढत गेला.

वयाच्या पन्नाशीत रवीन्द्रनाथांनी हे गीत लिहिले. प्रापंचिक, पारमार्थिक, वाङ्मयीन आणि एक कलाकार म्हणून, सर्वच पातळ्यांवर त्यांचे व्यक्तिमत्त्व त्यावेळी परिपक्व झाले होते. वयाच्या चाळिशीतच पत्नीचा वियोग झाल्यानंतर त्यावेळी नुकत्याच सुरू केलेल्या ‘शांतिनिकेतन’च्या कामात त्यांनी स्वत:ला झोकून दिले. त्यानंतर लगेच १९०५ च्या वंगभंगविरोधी आंदोलनातही रवीन्द्रनाथांची भूमिका आणि कार्य एखाद्या समंजस प्रगल्भ नेत्याला शोभेल, असेच होते. या फाळणीविरुद्ध त्यांनी बंगाली लोकांच्या मनात असंतोषाचे बीज रोवले. आपल्या काव्यप्रतिभेचा नेमका उपयोग त्यांनी या प्रत्येक वेळी केला. प्रत्यक्ष फाळणीच्या दिवशी हिंदू-मुस्लीम बांधवांना एकत्र आणून, गंगेवर स्नान करून एकमेकांना प्रेमाचे प्रतीक म्हणून राखी बांधायला लावण्याची त्यांची कृती म्हणजे त्यांच्या हळव्या कविमनाला व्यावहारिक कृतीची मिळालेली योग्य अशी जोडच होय. जे हिंदू-मुस्लीम ऐक्य तोडण्यासाठी ब्रिटिशांनी फाळणीची योजना केली, त्या हेतूलाच या रक्षाबंधनाच्या कृतीने त्यांनी रोखठोक उत्तर दिले.

रवीन्द्रनाथांची जशी कीर्ती वाढत होती, तशी त्यांच्या निंदकांची संख्याही वाढत होती. रवीन्द्रनाथांनी स्वत:च्या कृतीने कोणाला दुखावले नसले, तरी त्यांच्याबद्दलच्या मत्सरामुळे असे अनेक छुपे शत्रू त्याहीवेळी होते. साहित्याच्या पडद्याआडून वैयक्तिक आयुष्यावर हल्ला चढवण्यासाठी ते निंदक पुढे आले. ‘जन-गण-मन’ या साहित्यकृतीचा उपयोग करून त्याच्या पडद्याआडून रवीन्द्रनाथांवर जो आरोप लावला गेला, किंबहुना त्यांच्या जीवनाचा मूळ स्रोत असणाऱ्या देशभक्तीविषयीच जी शंका घेतली गेली, त्यामुळे रवीन्द्रनाथ कमालीचे व्यथित झाले. एखाद्या कलाकृतीबद्दल किंवा साहित्यकृतीबद्दल प्रत्येकाची मते वेगवेगळी असू शकतात. परंतु ज्या हेतूतून या कवितेची निर्मिती झाली, त्या हेतूच्या बरोबर उलटा अर्थ काढून देशभक्तीविषयी

शंका घेऊन आपल्यावर टीकेचे वार केले जावेत, हे रवीन्द्रनाथांच्या कल्पनेबाहेर होते. आपल्या संयमशील स्वभावाला अनुसरून त्यांनी आपल्या टीकाकारां लगेच प्रतिहल्ला चढवला नाही.

'जन-गण-मन' च्या निर्मितीनंतर लगेचच त्यांच्या पन्नासाव्या वाढदिवसाच निमित्ताने वंगीय साहित्य परिषदेने २८ जानेवारी १९१२ रोजी कलकत्त्याम रवीन्द्रजन्मोत्सव साजरा केला. एखाद्या साहित्यिकाचा, एवढ्या मोठ्या प्रमाण जन्मदिनाच्या निमित्ताने गौरव सोहळा प्रथमच होत होता. महाराजा मणींद्रचन्द नन्द शास्त्रज्ञ डॉ. जगदीशचन्द्र बोस, शास्त्रज्ञ प्रफुल्लचंद्र राय, साहित्यिक व संपाद रामानंद चट्टोपाध्याय यांनी या कामात पुढाकार घेतला होता.

या गौरवामुळे भारावलेल्या रवीन्द्रनाथांनी या सत्काराला उत्तर देताना आपल वाङ्मयनिर्मितीची प्रक्रियाही सांगितली.

''माझ्या आयुष्याची चाळीसांहून अधिक वर्षें साहित्याच्या सेवेंत मी वेंचिल ह्या काळांत मी अनेकांना दुखविले. हट्टाने अनेकांचे मत मानलें नाही, जिद्दीने अ आग्रही वृत्तीने वागलो, कित्येकदा कठोर व ताठरहिं बनलो. असें असूनहिं तुम्ही सारे विसरून आज माझ्या गळयांत ही पुष्पमाला घालीत आहां, ह्याच्या मुळा तुम्हांला मजबद्दल वाटणारें प्रेमच आहे. तुमच्या मनाचा मोठेपणाच त्यांत दिस आणि त्या मोठेपणामुळेच मला आज मोठेपण मिळत आहे...

मी जें आजवर तुम्हांला दिले त्याहून कितीतरी पटींनी मोठी परतभेट तुम्ही म आजच्या प्रसंगीं देत आहां... येथें एक गोष्ट मात्र मला सांगावीशी वाटते, ती ही व मी जें जें काही वाङ्मयस्वरूपांत तुम्हाला दिलें आहे तें, मला स्वतःला देण्या योग्यतेंचें वाटलें, तेव्हांच दिलें आहे. मागणींप्रमाणे पुरवठा मी कधींच केला ना लोकांना काय आवडते किंवा आवडेल, हें पाहून न लिहितां, माझ्या ध्येयाला ध मला जें आवडलें व लिहावेंसें वाटलें, तेंच मी लिहिलें आणि लोकांपुढें ठेविलें. न छंद आणि नवीन रचनारीती ह्यांचा अवलंब करून मी जें लिहिलें, ते प्रारंभीं प्रा लोकांना रुचले नाही. थट्टा झाली. आज तें रुचत असेल किंवा त्याला मिळ तितकी मान्यता मिळत असेल, असे मी समजत नाही; मान्यता मिळावी, अ माझा आग्रहहि नाही. सांगण्याचा हेतु एवढाच कीं, मला जें माझें असें वाटलें, मी लोकांना दिलें; जे प्रयोग करावेसे वाटले, ते केले व लोकांपुढे ठेवले. स लोकप्रियता मिळवण्याकरिता सुलभ अन् सोईस्कर मार्गांचा मी कधींच अवलंब के नाही; लोकांना भुलवून, फसवून संतुष्ट करणे कित्येकदा सहज शक्य असतें. पण संतुष्टता एक दिवस तुमचीच फसवणूक करते. असल्या सवंग संतुष्टतेकडे मी व ढुंकूनहि पाहिले नाही. माझ्या लेखांतून लोकांना न रुचणाऱ्या अनेक गोष्टी मांडल्या व त्याच्या कटु प्रतिक्रिया होऊन माझ्याविरुद्ध अनेकदा प्रतिकूल वाहिले. मी मुकाट राहून ते वाहू दिले, मनाला विचलीत होऊं दिलें नाही. आपल्य

[illegible] वाटतें त्यालाच धीराने अन् समर्थपणे चिकटून राहण्यांत खरे समाधान आहे; [illegible] शांति मिळते. तोंडसुख घेऊन किंवा तोंडपुजेपणा करून कायम स्वरूपाचें [illegible] कधींच मिळावयाचें नाही. उपहास, विरोध, हेटाळणी आणि विडंबन ह्यांची [illegible] अनेक वेळा उडविण्यांत आली. परंतु माझा मार्ग व माझ्या पद्धती [illegible] मी दूर झालों नाही. लोकप्रियता मिळवण्यासाठीं सत्याचा विक्रय मी कधीं [illegible] नाही...

[illegible] देशाबद्दल माझ्या अंत:करणांत निरतिशय आदर वास करीत असतो. [illegible] असलेले रत्नभांडार दुनियेंत कोठें आढळणार नाही. त्याची किंमत न [illegible] दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या ह्या देशांत त्याचे अवमूल्यन करण्याचा [illegible] वा अप्रत्यक्ष प्रयत्न होतो, तेव्हां तसें करणाऱ्यांची मी यत्किंचितहि गय [illegible] नाही. अशा वेळीं माझ्या व इतरांच्या मतांत विरोध उत्पन्न होऊन झगडे [illegible] त्यांची झळ त्यांना तशीच मलाहि लागली. हें सर्व आठवले आणि आज [illegible] असलेला हा अपूर्व सत्कार अन् व्यक्त करीत असलेली गुणज्ञता [illegible] कीं, माझे अंत:करण भरून येते, मस्तक आदराने लवते.'' (रवीन्द्रनाथ [illegible], ग. दे. खानोलकर, पृष्ठ २८४-२८५)

[illegible]विरोधी आंदोलनातील रवीन्द्रनाथांचे योगदान माहिती असूनही ब्रिटिश [illegible] त्यांना १९१५ मध्ये 'सर' हा किताब दिला किंबहुना त्यांना द्यावाच [illegible] नोबेलसारख्या सर्वोच्च पुरस्काराने जागतिक पातळीवर रवीन्द्रनाथांचा गौरव [illegible] इथल्या राज्यकर्त्यांना मात्र त्याचे काहीच कौतुक नाही, असा सूर [illegible] उमटू लागल्यानंतर त्यांना या पुरस्काराने गौरवले गेले. जालियाँवाला बाग [illegible] वृत्त कळताच रवीन्द्रनाथांनी अस्वस्थ होऊन कलकत्यामध्ये काँग्रेस [illegible] मदतीने जाहीर सभा घेण्याचे ठरवले. परंतु पंजाबमध्ये असलेला मार्शल [illegible] हत्याकांड करूनही इंग्रजांची संपूर्ण देशभर चालू असलेली दडपशाही [illegible] जाहीर सभा घेण्यास कलकत्त्यातील काँग्रेस पुढारी चालढकल करू [illegible] मात्र रवीन्द्रनाथांनी वैयक्तिक पातळीवर याचा निषेध करण्याचा निर्णय [illegible] हा निर्णय अत्यंत धाडसी होता. या हत्याकांडाचा निषेध करणारे आरोपपत्र [illegible] ते व्हॉइसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांना पाठवले व त्याचबरोबर ब्रिटिश [illegible] दिलेली 'सर' ही पदवी त्यांनी परत केली. व्हॉइसरॉयना पाठवलेले पत्र [illegible] प्रसिद्धीसाठी पाठवले. हे पत्र जगभरात प्रसिद्ध होताच ब्रिटिश राजसत्तेच्या [illegible] धिंडवडे निघाले; कारण बादशहांनी सन्मानपूर्वक दिलेली 'सर' ही पदवी परत [illegible] बादशहांचा आणि ब्रिटिश साम्राज्याचा भयंकर अपमान केला असल्याची [illegible] ब्रिटिशांमध्ये झाली होती. आपल्या कृतीतून रवीन्द्रनाथांनी भारतीय जनतेची [illegible] काळाच्या राजकारणात अत्यंत निर्भयपणे मांडली. (हे पत्र परिशिष्ट पृष्ठ १००- [illegible] पाहा.)

'जन-गण-मन' हे गीत पंचम जॉर्ज यांच्या भारतातील आगमनाच्या पार्श्वभूमी झालेल्या १९११ च्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात जरी म्हटले गेले, तरी ख त्यासाठी ते रचलेले नाही. भारताच्या तथाकथित इंग्रज भाग्यविधात्याला उद्देशून रचलेले नाही. हा 'भारतभाग्यविधाता' म्हणजे पंचम जॉर्ज, हा समज किती दुष्ट भ्रामक आहे, हे रवीन्द्रनाथांनीच पुढील दोन पत्रांत स्पष्ट केले आहे :

'जन-गण-मन'वरील टीका मर्यादित स्वरूपात का होईना, पण चालूच राहि होती. त्यामुळे प्रदीर्घ कालावधीनंतर आपले मित्र पुलिनबिहारी सेन यांना नोव्हेंबर १९३७ रोजी पाठवलेल्या पत्रात त्यांनी आपल्या भावना व्यक्त केल आहेत.

**''सरकारदरबारी प्रतिष्ठा पावलेल्या माझ्या एका मित्राने सम्राटांचे जयग रचण्याबद्दल मला विशेषच आग्रह केला; मी विस्मित झालो. विस्मयाबरोबरच क्षे उसळला. ह्याच मनःस्तापाच्या प्रबल प्रतिक्रियेच्या धक्क्यांतून 'जन-गण-म अधिनायक' ह्या गीताचा जन्म झाला. ('पतन-अभ्युदय-बंधुर') पतन-अभ्युदया खडबडीत बनलेल्या मार्गावरून युगानुयुगें वेगाने प्रवास करणाऱ्या ('युगयुगधा यात्री') यात्रिकांचा जो चिरसारथि, जनगणाचा अंतर्यामी व मार्गदर्शक ('पथपरिचायव अशा त्या 'भारतभाग्यविधात्याचा' मी त्या गीतांत जयघोष केला आहे. हा 'युगयुगांतर मानवभाग्यरथचालक' कोणी पाचवा, सहावा किंवा आणखी एखादा जॉर्ज कव्ह होऊ शकणार नाही, ही गोष्ट त्या राजभक्त मित्राच्याही लक्षात आली. कारण (त्या राजभक्ती कितीही प्रबळ असली, तरी (त्याच्या) ठिकाणी बुद्धीचा अभाव नव्हता गीत खास राष्ट्रीय सभेसाठी लिहिले नव्हते.''**

या पत्रानंतर पुन्हा दीड वर्षानंतरच्या एका पत्रामध्ये त्यांनी या आरोपाचे खंडन केले. इतके दिवस आपण या टीकाकारांना का उत्तर दिले नाही, याविषय शंका त्यांनी दूर केली. २९ मार्च १९३९ या दिवशी सुधाराणी देवी हिला लिहिले पत्रामध्ये ते लिहितात,

**''शाश्वत मानवेतिहासातील युगानुयुगे प्रवास करणाऱ्या पथिकांच्या रथया चिरसारथी म्हणून चौथ्या किंवा पाचव्या जॉर्जचे स्तवन माझ्याकडून केले जा इतकी अपरिमित मूढता माझ्या ठिकाणी आहे, अशी माझ्यासंबंधी ज्यांना शंका असेल, त्यांच्या प्रश्नांना उत्तर देणे ही आत्मावमानना होय.''**

रवीन्द्रनाथांच्या अनेक साहित्यकृतींवर काही वेळा टीका झालेली होती. त भाषा, कथांची मांडणी, कवितांमधून जाणवणारा संस्कृतचा ओढा यांवर ट होऊनही रवीन्द्रनाथांचे साहित्य सर्वसामान्यांत लोकप्रिय झालेले होते. अभिज आणि प्रतिभाविलास यातही त्यांचे साहित्य कुठेच कमी नव्हते. त्यांच्या वा लोकप्रियतेमुळे साहित्यातील हितशत्रूंनी केलेल्या टीकेमुळे रवीन्द्रनाथ दुःखी तरीही ही दोन पत्रे वगळता, त्यांनी त्याला कधी जाहीर उत्तर किंवा वाद-विव

उत्तर स्वत:हून दिले नाही. रवीन्द्रनाथांचे समर्थक ज्यावेळी त्यांच्या साहित्याविषयी बाजू मांडण्याचा प्रयत्न करीत, त्याही वेळेस रवीन्द्रनाथ त्यापासून अलिप्त राहिले.

'जन-गण-मन'कडे स्वत: रवीन्द्रनाथांनी स्वतंत्र भारताचे भावी राष्ट्रगीत म्हणून पाहिलेले दिसत नाही. या गीताच्या प्रसिद्धीसाठी त्यांनी फारसे प्रयत्न केलेले दिसत नाही. १९३७-३८ च्या सुमाराला 'वन्दे मातरम्'विषयी जी समिती नेमण्यात आली, त्याचे रवीन्द्रनाथ अध्यक्ष होते. त्याहीवेळेस 'जन-गण-मन'चा उल्लेख दिसत नाही. रवीन्द्रनाथांच्या स्वभावातील संयमशीलता आणि अलिप्तपणा पाहता 'जन-गण-मन'वरील आरोपांना त्यांनी प्रत्येकवेळी उत्तर का दिले नाही, याचा उलगडा होऊ शकेल. या दोनच पत्रांमध्ये रवीन्द्रनाथांनी दिलेले उत्तर व आक्षेपांचे केलेले खंडन हे इतके सुस्पष्ट आहे, की 'जन-गण-मन'वरील टीका त्याचवेळी थांबायला हवी होती. एखाद्या वादाला राजकीय स्वरूप येते, त्यावेळी त्यातील तारतम्य बरेच वेळा गमावलेले असते. एखाद्या प्रश्नावर आंदोलन करणारे नेते त्या विषयाच्या मुळापर्यंत फार क्वचितच गेलेले असतात. आजही काही सन्माननीय अपवाद वगळता राजकीय क्षेत्रात अभ्यासू व्यक्तिमत्त्वांची वानवाच आहे. 'जन-गण-मन'चा वाद साहित्यिक व्यासपीठावरून राजकीय व्यासपीठावर गेला. त्यानंतर अशा राजकीय माध्यमातून या गीतावर आक्षेप घेताना रवीन्द्रनाथांच्या राष्ट्रभक्तीविषयी घेतलेली शंका मात्र निंदनीयच होती. त्यासाठी रवीन्द्रनाथांचे जीवनचरित्र, त्यांचे साहित्य अभ्यासायची गरज कुणाला वाटलेली दिसत नाही. स्वातंत्र्यापूर्वीच १९४१ मध्ये रवीन्द्रनाथांचे निधन झाले. स्वातंत्र्यप्राप्तीच्यावेळी रवीन्द्रनाथ हयात असते, तर त्याही वेळेस 'जन-गण-मन'विषयी त्यांनी आग्रही भूमिका घेतली असती, असे वाटत नाही. मात्र 'जन-गण-मन' ही राष्ट्रगीत होण्यासाठी मुद्दाम रचलेली रचना नव्हती, उत्तम काव्यकृतीमध्ये लागणारी अभिजातता, प्रतिभाविष्कार हे सर्व गुण 'जन-गण-मन' या गीतात होते, हे त्यांचे टीकाकारही मान्य करतील.

■■■

प्रकरण ६ :

# आणि ‘जन-गण-मन’ राष्ट्रगीत झाले!

१९४६ मध्ये स्वातंत्र्य दृष्टिक्षेपात असताना घटनासमितीची स्थापना झाल साहजिकच राष्ट्रगीत, राष्ट्रध्वज, राष्ट्रचिन्ह किंवा राजमुद्रा यांची निश्चिती, घटनेनुस त्यांना देण्यात येणारे स्थान या सर्वांविषयीची चर्चा घटनासमितीच्या सभांमध्ये हो लागली. २२ जुलै १९४७ रोजी पंडित नेहरू यांनी घटनासमितीपुढे अशोकचक्रांवि तिरंगी ध्वज सादर केला आणि त्याच ध्वजाला राष्ट्रध्वज म्हणून मान्यता मिळाल या ध्वजाच्या नमुन्यानुसार तयार झालेले ध्वज १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारता स्वातंत्र्यप्राप्तीच्या वेळी प्रथम संपूर्ण देशभर फडकावले गेले. यावेळेस राष्ट्र म्हणून ‘जन-गण-मन’ची निश्चिती झालेली नव्हती.

भारतीय जनतेने संपूर्ण स्वातंत्र्यलढ्यात ज्या गीताला राष्ट्रगीताचे स्थान होते, त्या ‘वन्दे मातरम्’ला बाजूला ठेवून ‘जण-गण-मन’ला राष्ट्रगीताचे स्थ देण्यासाठी स्वत: पंडित नेहरूंनी पुढाकार घेतला होता.

मग ‘जन-गण-मन’ हे भावी राष्ट्रगीत म्हणून घेण्याची पहिली कल्पना कोणाच पंडित नेहरूंची की आणखी कोणाची?

‘वन्दे मातरम्’ला स्वातंत्र्यलढ्यातील हजारो देशभक्तांचे आणि ‘वन्दे मातरम्’ शब्द उच्चारत फासावर चढलेल्या क्रांतिकारकांच्या बलिदानाचे नैष्ठिक अधि लाभले होते. तशी कोणतीच स्वातंत्र्यलढ्यातील पार्श्वभूमी ‘जन-गण-मन’ला किंबहुना ‘सारे जहाँ से अच्छा’, ‘विजयी विश्व तिरंगा प्यारा’ अशा इतर गीतांप्र ‘जन-गण-मन’चे गायन स्वातंत्र्यलढ्यात झाल्याचे दिसत नाही. ज्या ज्या वे मुस्लीम लीगने ‘वन्दे मातरम्’वर आक्षेप घेतले, त्या त्या वेळी काँग्रेसे ‘वन्दे मातरम्’ची काटछाट केली, परंतु त्यावेळीही ‘जन-गण-मन’ला पुढे आणण्या कोणीही प्रयत्न केलेले दिसत नाहीत.




आझाद हिंद सेना आणि नेताजी सुभाषचंद्र बोस.

## 'नेताजी' आणि 'जन-गण-मन'

सुभाषचंद्र बोस हरिपुरा (१९३८) व त्रिपुरा (१९३९) येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या दोन अधिवेशनांचे अध्यक्ष असताना त्या अधिवेशन प्रसंगी त्यांनी 'वन्दे मातरम्'चे गायन आग्रहाने करून घेतले होते. त्यावेळी प्रसिद्ध बंगाली संगीतकार तिमिरबरन भट्टाचार्य यांनी संगीतबद्ध केलेली ही 'वन्दे मातरम्'ची संगीतरचना पुढच्या काळात आझाद हिंद सेनेमध्ये 'मार्चिंग साँग' म्हणून वापरली जात होती.

'वन्दे मातरम्'विषयी निर्णय घेण्यासाठी जी समिती १९३७ मध्ये रवीन्द्रनाथांच्या अध्यक्षतेखाली काँग्रेसने नियुक्त केली होती, त्यातही सुभाषचंद्र बोस होते.

पुढे कलकत्त्यातून नजरकैदेतून पलायन करून सुभाषचंद्र बोस पेशावर-काबूलमार्गे जपान व जर्मनीत पोहोचले. आझाद हिंद सेनेची जुळवाजुळवी सुरू झाली.

४ नोव्हेंबर १९४१ रोजी फ्री इंडिया सेंटरच्या सभेत सुभाषचंद्र बोस यांची नेताजी निवड झाली. घोषवाक्य म्हणून 'जयहिंद'ची व राष्ट्रगीत म्हणून 'जन-गण-मन'ची, व्यवहारासाठी रोमन लिपीतील हिंदुस्थानी भाषा (हिंदी) यांची निवड करण्यात आली.

आग्नेय आशियात कॅप्टन मोहनसिंगांच्या नेतृत्वाखाली पहिल्या आझाद हिंद फौजेचे विसर्जन झाले होते व रासबिहारी बोस आझाद हिंद फौजेची पुन:स्थापना करण्याच्या प्रयत्नात होते.

या सुमारास ११ सप्टेंबर १९४२ मध्ये जर्मनीतील हॅम्बुर्गच्या अटलांटिक हॉटेलच्या सभागृहात 'जन-गण-मन'हे राष्ट्रगीत म्हणून सर्वप्रथम गायले गेले. इंडो-जर्मन सोसायटीच्या उद्घाटनाच्या या कार्यक्रमास हॅम्बुर्गचे महापौर, मुत्सद्दी व अनेक देशांचे राजनैतिक प्रतिनिधी हजर होते. समारंभ संपताना हॅम्बुर्ग रेडिओच्या चेंबर ऑर्केस्ट्राने जर्मनी आणि भारत या दोन देशांची राष्ट्रगीते वाजवली. ह्या ऑर्केस्ट्राचे संचलन डॉ. ऐगेल कुल्गे (Kruttage) यांनी केले होते. 'जन-गण-मन'ची स्वरलिपी



महात्मा गांधीजींसमवेत आझाद हिंद सेनेचे अधिकारी महात्मा गांधींच्या मागे उभे सरदार पटेल व पंडित नेहरू.

डॉ. अम्बिक मुजूमदार यांनी केली होती. डॉ. अम्बिक मुजूमदार यांनी क्विन्स युनिव्हर्सिटीमधून डॉक्टर ऑफ म्युझिक ही पदवी प्राप्त केली होती. त्यांनी 'ज गण-मन'ला पियानोची साथ केली. परदेशात भारताचे राष्ट्रगीत म्हणून अधिकृत 'जन-गण-मन'चा उपयोग करण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. ह्या समारंभा काही भागाचे मेणाच्या तबकडीवर जे ध्वनिमुद्रण झाले, त्याची ध्वनिमुद्रिका नि होती. डॉ. नरहर गोविंद गणपुले हे सुभाषचंद्रांचे जवळचे सहकारी होते. त्यांच्य पुढाकाराने हा कार्यक्रम झाला होता. त्यांनी जतन केलेले 'जन-गण-मन'चे हे प व दुर्मीळ ध्वनिमुद्रण पुढे आकाशवाणी, दिल्ली केंद्राकडे सोपविण्यात आले. गणपुले ह्या कार्यक्रमास उपस्थित होते. (या घटनेची माहिती देण्यासाठी आकाशव केंद्राने १९८० मध्ये प्रसारित केलेल्या 'अ नॅशनल अँथेम बॉर्न इन एक्झाईल' विशेष कार्यक्रमाची संहिता परिशिष्टमध्ये पृष्ठ १०७ पाहा.)

पुढे आझाद हिंद सेनेचे नेतृत्व स्वीकारल्यानंतर सशस्त्र सेना उभारून नवे धोके स्वीकारत असताना सुभाषचंद्रांना 'वन्दे मातरम्' की 'जन-गण-मन', नवीन वादाला निमंत्रण द्यायचे नसावे. शिवाय 'जन-गण-मन' त्याच्या मूळ स्व न घेता त्याचा हिंदी अनुवाद त्यांनी स्वीकारला. हा अनुवाद म्हणजे 'जन-ग मन'चे शब्दशः भाषांतर नाही. 'जन-गण-मन'च्याच रचनेमध्ये तोच आशय हे गीत तयार केले गेले आहे. मूळ 'जन-गण-मन'ची संगीतरचना स्वतः रवीन्द्रनाथां आहे. रवीन्द्रसंगीतातील संकेतानुसार रवीन्द्रनाथांनी बांधलेल्या संगीतरचनेत को बदल होत नाहीत. त्यामुळे 'जन-गण-मन'शी साधर्म्य असणाऱ्या या गीत संगीतरचनाही मूळ रवीन्द्रनाथांच्या संगीतरचनेप्रमाणेच करण्यात आली आहे. अ हिंद सेनेच्या फौजेमध्ये याला राष्ट्रगीताचा मान होता. सैनिक व अधिकाऱ्यांम लोकप्रियही होते. नेताजींच्या आकस्मिक अपघातानंतर आणि मणिपूर भागात अ हिंद सेनेला घ्याव्या लागलेल्या माघारीनंतर आझाद हिंद सेनेच्या अधिका



महात्माजींसमोर आझाद हिंद सेनेचे सदस्य राष्ट्रगीत सादर करताना.

खटले दाखल झाले. जनमताच्या प्रचंड रेट्यामुळे ब्रिटिशांना या सर्व अधिकाऱ्यांची राजद्रोहाच्या आरोपातून मुक्तता करावी लागली. या मुक्ततेनंतर या सर्व अधिकाऱ्यांनी लाल किल्ल्यावरून निघून थेट गांधीजींचीच भेट घेतली होती. या अधिकाऱ्यांमध्ये सेहगल, धिल्लाँ, शहानवाज खान यांच्याबरोबर आझाद हिंद सेनेचे वाद्यवृंद प्रमुख कॅप्टन रामसिंग होते, त्यांच्याच नेतृत्वाखाली या अधिकाऱ्यांनी गांधीजींसमोर 'जन-गण-मन'चे गायन केले होते.

"१९४६ मध्ये एका राजनैतिक बैठकीसाठी भारतीय शिष्टमंडळ विजयालक्ष्मी पंडित यांच्या नेतृत्वाखाली अमेरिकेत गेले होते. त्यांच्या सन्मानार्थ दिल्या जाणाऱ्या मेजवानीप्रसंगी भारतीय राष्ट्रगीत वाजवले जावे, अशी सूचना संयोजकांनी कार्यक्रम ज्या हॉटेलमध्ये होणार होता, त्या हॉटेलच्या वाद्यवृंदाला दिली होती. त्यावेळी विजयालक्ष्मी पंडित यांच्याकडे 'जन-गण-मन'ची ग्रामोफोन ध्वनिमुद्रिका होती. तीच ध्वनिमुद्रिका त्यांनी वाद्यवृंदाला दिली व त्याप्रसंगी वाद्यवृंदाने ती सादर केली. उपस्थितांना ही संगीतरचना व गीत अतिशय आवडले. पुढे ही ध्वनिमुद्रिका बीबीसी, लंडन तसेच अनेक पाश्चात्त्य संगीतकारांकडे ऐकवण्यासाठी पाठवण्यात आली."

(१ ऑक्टोबर १९६१ रोजी पंडित नेहरू यांनी दिल्लीत झालेल्या राष्ट्रीय एकात्मता संमेलनात केलेल्या भाषणानंतर 'दि हिंदू', ३ ऑक्टोबर १९६१ रोजी प्रसिद्ध झालेल्या बातमीनुसार)

अमेरिकेतील या कार्यक्रमात उपयोगात आणलेली 'जन-गण-मन'ची ध्वनिमुद्रिका कोणी तयार केली होती व भारताचे आगामी राष्ट्रगीत म्हणून 'जन-गण-मन' घोषित झालेले नसतानाही ही ध्वनिमुद्रिका भारताचे राष्ट्रगीत म्हणून का वाजवली गेली, हे प्रश्न अनुत्तरित आहेत.

एकूण स्वातंत्र्यलढ्यात 'जन-गण-मन'ला कोणतेही स्थान नसताना अचानकपणे राष्ट्रगीत म्हणून 'जन-गण-मन' पुढे आल्यामुळे जनतेला मोठा धक्का बसला. राज्यकर्त्यांच्या संशयास्पद भूमिकेमुळे १९११ मधील 'जन-गण-मन'च्या निर्मितीनंतर

वादाच्या भोवऱ्यात सापडलेले 'जन-गण-मन' पुन्हा एकदा संशयाच्या भोवऱ्यात सापडले. ह्यावेळी रवीन्द्रनाथ हयात नसतानाही पुन्हा एकदा गीतरचनेमागच्या हेतूव संशय घेतला गेला.

१९४६ मध्ये घटनासमितीची स्थापना झाली. १५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वातंत्र्य मिळाले. स्वातंत्र्यप्राप्तीच्या मुख्य कार्यक्रमात 'जन-गण-मन' व ' मातरम्' दोन्हीही गीते राष्ट्रगीत म्हणून सादर केली गेली. मात्र अधिकृत राष्ट्रगीत म यांपैकी कोणत्याही गीताची घोषणा केली नव्हती.

पंडित नेहरूंच्या मनात 'जन-गण-मन' हेच राष्ट्रगीत व्हावे, असे होते. त्या त्यांनी प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष रीतीने प्रयत्न सुरू केले होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर १ पर्यंतच्या घटनासमितीचे काम चालू असलेल्या काळात 'जन-गण-मन'लाच ता राष्ट्रगीताचे स्थान देण्यात आले. घटनासमितीतील सदस्यांचा कौल कदाचित मातरम्'लाच असू शकेल, असे वाटल्यामुळे संसदेत वा घटनासमितीत बहुमताने सोडवण्यासाठी सार्वमत घेण्याचा मार्ग नेहरूंनी पत्करला नाही. लोकशाही त बसेल, अशा पद्धतीने नेहरूंनी 'जन-गण-मन'ला राष्ट्रगीताचे स्थान देण्या प्रयत्न सुरू केले. या संदर्भात त्यांनी पार्लमेंटमध्ये २५ ऑगस्ट १९४८ रोजी वक्तव्य केले.

Jawaharlal Nehru on the National Anthem

...having a tune for the national anthem to be played by the orche and bands became an urgent question to us immediately after August 1947. It was important from the point of view of our defence services foreign embassies and delegations. It was obvious that God Save the was not suitable for our army bands after the change-over to independe We were constantly being asked about the tune to be played and coul give an answer because the ultimate decision could be made only by Constituent Assembly.

The tune of Janaganamana had been slightly varied and adopted a national anthem by the Indian National Army in South East Asia and i subsequently attained a degree of popularity in India also.

The matter came to a head on the occasion of the General Assemb the United Nations in 1947 in New York. Our delegation was asked fo national anthem to be played on a particular occasion. The delegation poss a record of Janaganamana and they gave this to the orchestra to pra When they played it before a large gathering, it was greatly appreciate representatives of many nations asked for the musical score of this tune which struck them as distinctive and dignified. This orchestral rend of Janaganmana was recorded and sent to India. Our defence services began to play this tune and foreign embassies and delegations used it whe required. Various countries sent us messages of appreciation congratulations on this tune which experts considered to be superior to

national anthems they had heard. Expert musicians, bands and orchestra at home and abroad played it, sometimes, with slight variation of tune, with the result that All India Radio was able to collect a number of renderings.

Apart from the general appreciation with which this tune was received, there was at the time not much choice for us, as there was no proper musical rendering of any other national song which was could send abroad. At that stage, I wrote to all the Provincial Governors and asked their views about adopting Janganamana or any other song as the national anthem. I asked them to consult their Premiers before replying. I made it perfectly clear to them that the final decision rested with the Constituent Assembly, but owing to the urgent need of sending some directions to foreign embasies and the defence services, a provisional decision became essential. Every one of these Governors, except one (the Governor of the Central Provinces) signified his approval of Janaganamana. Thereupon the Cabinet considered the matter and came to the decision that provisionally Janaganamana should be used till such times as the Constituent Assembly came to a final decision.

Instructions were issued accordingly to the Provincial Governors. It was very clear that the wording of Janaganamana was not wholly appropriate and some changes would be necessary. What was important was the tune to be played by bands and orchestras, and not the wording.

Subsequently the new Premier of West Bengal informed that he and his Government preferred Vande Mataram.

That is the position at present. It is unfortunate that some kind of argument has arisen between Vande Mataram and Janaganamana. Vande Mataram is obviously and indisputably the premier national song of India with a great historical tradition, it was intimately connected with our struggle for freedom. The position it is bound to retain and no other song can displace it. It represents the passion and poignancy of that struggle but perhaps not so much the culmination of it.

अर्थ : १५ ऑगस्ट १९४७ नंतर लगेचच ऑर्केस्ट्रा आणि बँडवर राष्ट्रगीत वाजविण्यासाठी धून बनवणे अत्यावश्यक बनले. आमच्या सुरक्षा सेवा, विदेशातील दूतावास आणि प्रतिनिधी मंडळांच्या दृष्टीने ते महत्त्वाचे होते. स्वातंत्र्यानंतर 'गॉड सेव्ह द किंग' हे सैनिकी बँडसाठी उपयुक्त नाही हे स्पष्टच होते. त्याच वेळी आम्हाला असा प्रश्न विचारला जात होता, की कोणती धून वाजवावी, यावर आम्ही निरुत्तर होतो, कारण अंतिम निर्णय हा संविधान सभेचाच होणार होता.

'जन-गण-मन'च्या चालीमध्ये काही फेरफार करून त्याला राष्ट्रगीताच्या स्वरूपात दक्षिण-पूर्व आशियात 'इंडियन नॅशनल आर्मी'ने स्वीकारले व त्यानंतर भारतातही ते आज लोकप्रिय होऊ लागले आहे.

न्यूयॉर्कमध्ये सन १९४७ ला संयुक्त राष्ट्रसंघाच्या 'जनरल असेंब्ली'मध्ये या प्रश्नाने पुन्हा डोके वर काढले. या वेळी आमच्या अधिकारी वर्गाकडे भारतीय राष्ट्रगीताची मागणी झाली. आमच्या अधिकाऱ्यांकडे त्या वेळी 'जन-गण-मन'ची ध्वनिमुद्रिका

होती आणि त्यांनी तीच रेकॉर्ड वाद्यवृंदाकडे अभ्यासासाठी दिली. जेव्हा युनोच्या
त्याचे सर्वांसमोर सादरीकरण केले, तेव्हा सर्वांनाच ते खूप आवडले आणि अ
देशांच्या प्रतिनिधींनी या नव्या चालीच्या गीताच्या स्वरलिपीची मागणी केली
'जन-गण-मन'चे वृंदवादन ध्वनिमुद्रित करून भारतात पाठवले गेले. आमच्या सेने
बँडवर ही धून वाजवली जाऊ लागली आणि विदेशातील आपले दूतावासातील प्रति
मंडळ आवश्यकतेनुसार याचा उपयोग करू लागले. अन्य देशांतील जाणकारांच्या
ही धून अन्य राष्ट्रगीतांपेक्षा श्रेष्ठच होती आणि याबद्दल असे प्रशंसोद्गारही पाठ
संगीततज्ज्ञांनी, घोषपथकांनी देश-विदेशामध्ये याचे वादन केले. कधी कधी चाली
काही परिवर्तन करून ते वाजवले गेले. ऑल इंडिया रेडिओकडे अशा चालींचा
संग्रहच झाला आहे. या चालीला मिळालेल्या प्रशंसेशिवाय आमच्याकडे दुसरा कु
पर्यायच नव्हता. आम्ही विदेशात पाठवू शकू अशा योग्यतेचे, चांगल्या संगीतर
कोणतेही राष्ट्रगीताचे प्रस्तुतीकरण आमच्याकडे उपलब्ध नव्हते. अशा वेळी मी
राज्यांमध्ये राज्यपालांना पत्र लिहिले व 'जन-गण-मन' किंवा अन्य कोणत्या गी
राष्ट्रगीत म्हणून स्वीकारावे, याबद्दल विचारणा केली व त्यांची मते मागवली. मी त
असेही सांगितले, की याचे उत्तर देण्यापूर्वी त्यांनी आपल्या मुख्यमंत्र्यांशी चर्चा क
मी त्यांना स्पष्टच सांगितले, की याचा अंतिम निर्णय संविधान सभाच करणार अ
परंतु विदेशी दूतावास व सुरक्षा सेवांसाठी ताबडतोब निर्णय देण्याची आवश्यकता
व मधल्या काळासाठी तत्काळ निर्णय घेण्याची जरूरी होती. (सेंट्रल प्रॉव्हिन्सेस
राज्यपालांच्या व्यतिरिक्त) सर्वांनी 'जन-गण-मन'ला मान्यता दिली. या विष
मंत्रिमंडळाने विचार केला व जोपर्यंत संविधान सभेचा अंतिम निर्णय होत
तोपर्यंतच्या मध्यावधी काळात 'जन-गण-मन'चा उपयोग करावा, या अंतिम निष्क
ते आले व त्यानुसार प्रांतांच्या राज्यपालांना निर्देश दिले गेले.

'जन-गण-मन'मध्ये काही प्रमाणात त्रुटी होत्या व त्यामध्ये काही परिवर्
बदल आवश्यक होते, हे जरी स्पष्ट होते, तरी सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी, की त्य
शब्दांपेक्षा चालीला अधिक महत्त्व असावे, कारण त्याची धून बँड आणि वाद्य
सहज वाजवता येऊ शकेल.

मात्र पश्चिम बंगालच्या नव्या मुख्यमंत्र्यांनी आणि त्यांच्या सरकारने 'वन्दे मातरम
पसंती कळवली. सध्या अशी परिस्थिती आहे - 'जन-गण-मन' आणि 'वन्दे म
यामध्ये एक प्रकारचा विवाद निर्माण होणे ही दुर्दैवाची गोष्ट आहे. 'वन्दे मातरम
स्पष्ट स्वरूपात निर्विवादपणे भारताचे प्रमुख राष्ट्रीय गीत आहे आणि त्यामागे एक
ऐतिहासिक परंपराही आहे. हे गीत आमच्या स्वतंत्रता संग्रामाशी अत्यंत घनिष्ठ स्व
जोडले गेले आहे आणि याची जागा दुसरे कोणतेही गीत घेऊ शकत नाही. हे ग
संघर्षाची मार्मिकता आणि भावावेश तीव्रतेने व्यक्त करते; परंतु त्यात अभिव्यक्त
प्रतिबिंबित होत नाही.''

२६ जानेवारी १९५० या दिवशी घटनासमितीच्या शेवटच्या बैठकीत डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी राष्ट्रगीताविषयी निवेदन जाहीर केले.

**‘‘जन-गण-मन’ या शब्दांनी तयार झालेले गीत व संगीत हे भारताचे राष्ट्रगीत आहे. या गीतातील शब्दांत सरकारला वेळ पडेल तेव्हा आवश्यक तो बदल करण्याचा अधिकार राहील. भारतीय स्वातंत्र्यासाठी झालेल्या लढ्यात ऐतिहासिक कामगिरी बजावलेल्या ‘वन्दे मातरम्’ला ‘जनगणमन’च्या बरोबरीने मान दिला जाईल. व त्याची प्रतिष्ठा त्या सारखीच राहील. मला वाटते, सभासदांचे याने समाधान होईल.’**

**या निवेदनामुळे ‘जनगणमन’ला ‘नॅशनल अँथेम’ (राष्ट्रगीत) व ‘वन्दे मातरम्’ला ‘नॅशनल साँग’ (राष्ट्रीय गीत) अशी मान्यता मिळाली.**

यावेळी सदस्यांचे मतदान किंवा चर्चा टाळून अध्यक्षांनी थेट निवेदन केले.

एक साहित्यकृती म्हणून, एक काव्य म्हणून रवीन्द्रनाथांच्या सर्वोत्तम काव्यांमध्ये ‘जन-गण-मन’ची गणना करता येईल. एक साहित्यिक म्हणून रवीन्द्रनाथांचे भारतीय साहित्यातील सर्वोच्च स्थान कोणीही नाकारू शकत नाही. तरीही ‘जन-गण-मन’च्या निमित्ताने रवीन्द्रनाथांवर असे आरोप केले गेले. जनतेची बहुमताने पसंती असलेल्या ‘वन्दे मातरम्’ला राष्ट्रगीताचे स्थान नाकारून तेथे ‘जन-गण-मन’ची स्थापना केल्यामुळे जनतेतील नाराजी हे जसे एक स्वाभाविक कारण होते, तसेच ह्या उठलेल्या वादळाचा फायदा रवीन्द्रविरोधक साहित्यिक कंपूने उठवला.

‘वन्दे मातरम्’ला निःसंशय राष्ट्रगीताचा मान मिळायला हवा होता, हे मान्य करूनही त्यांच्यासारख्या राष्ट्रभक्त कवीचा आपण अवमान करीत आहोत, याचे भान कोणालाही त्यावेळी नव्हते व आजही नाही.

हे गीत पंचम जॉर्ज किंवा तथाकथित कोणाही राजाच्या प्रशस्तीसाठी किंवा स्वागतासाठी रचलेले नाही. त्या गीताची निर्मिती ज्या एका उद्वेगातून झाली, त्या सर्वांचे स्पष्टीकरण स्वतः रवीन्द्रनाथांनी दिल्यानंतरही, आज स्वातंत्र्यानंतर ६४ वर्षे उलटली, तरीही लोकांच्या मनातला राजप्रशस्तिबद्दलचा संशय मिटलेला दिसत नाही.

रवीन्द्रनाथांच्या संपन्न, कलासक्त आयुष्याचा व अनेक प्रसंगांमधून प्रगटलेल्या त्यांच्या प्रखर देशभक्तीचा अभ्यास केल्यास ‘जन-गण-मन’विषयीचे मळभ दूर होऊ शकेल. जगातील सर्वांत मोठी लोकशाही असलेल्या आपल्या देशाच्या राष्ट्रगीताबद्दल आपल्या मनात कायमच नितांत आदराची भावना राहील.

■■■

प्रकरण ७ :

# ‘जन-गण-मन’ आणि ‘वन्दे मातरम्’

रवीन्द्रनाथांचे व्यक्तिमत्त्व अनेक कलांनी संपन्न असले, तरी त्यांची सर्वांत म ओळख विश्वकवी हीच आहे. रवीन्द्रनाथांनी आपल्या दीर्घ आयुष्यात वि कविता लिहिल्या. अत्यंत आशयसंपन्न, चिंतनात्मक अशा त्यांच्या अनेक कवितां ‘जन-गण-मन’ ही एक कविता. रवीन्द्रनाथांच्या काही कवितांनी वंगभंगवि आंदोलनातही लोकांना संघटित करण्याचे काम केले. ‘बांगलार माटी बांगलार ज असे या भूमीचे वर्णन करणारे रवीन्द्रनाथ हे संकुचित अर्थाने प्रादेशिक कवी नव

बंकिमचंद्रांनी ‘वन्दे मातरम्’ हे काव्य लिहिले असले तरी, बंकिमचंद्रांची ओळख ही बंगाली साहित्याला वेगळे वळण देणारे कादंबरीकार म्हणून आहे. ही कविता ‘आनंदमठ’मध्ये समाविष्ट केली आणि जणू या कादंबरीसाठीच या गी लेखन केले असावे, इतकी त्यात मिसळून गेली.

आज ‘जन-गण-मन’ला राष्ट्रगीताचे (National Anthem) स्थान मिळाले व ‘वन्दे मातरम्’ला मात्र (National Song) राष्ट्रीय गीताचे स्थान मिळाले आहे. मातरम्’ला राष्ट्रगीताचे स्थान न मिळाल्यामुळे ‘जन-गण-मन’वर टीकेचा भ होऊ लागला आणि पुढे तो रोष रवीन्द्रनाथांच्या दिशेने वळला. ‘वन्दे मातर राष्ट्रगीताचे स्थान मिळाले नाही, म्हणून रवीन्द्रनाथांच्या देशभक्तीविषयी शंका ‘जन-गण-मन’वर टीका करणे योग्य नाही. संपूर्ण स्वातंत्र्यलढ्यात ‘वन्दे मातर एखाद्या शस्त्राप्रमाणे उपयोगात आले आहे. नि:शस्त्र आंदोलकांचा त्याग, मातरम्’चा उच्चार केल्यामुळे त्यांनी सोसलेल्या अपार शारीरिक यातना आणि क्रांतिकारकांनी ‘वन्दे मातरम्’या शब्दाचा उच्चार करीत हसत स्वीकारलेला मृत्यू सर्वांचे अधिष्ठान ‘वन्दे मातरम्’च्या पाठीमागे आहे. त्यामुळे राज्यघटनेने रा म्हणून ‘वन्दे मातरम्’ला मुख्य स्थान दिले नसले, तरीही राष्ट्रगीतासमान दर्जा आहे. राष्ट्रगीत आणि राष्ट्रीय गीत असा शब्दांचा खेळ बाजूला ठेवून स्वातंत्र्यान लोकांनी ‘वन्दे मातरम्’चा स्वीकार राष्ट्रगीताच्या बरोबरीने केला आहे, हे सत्य

पण ह्याच कारणासाठी ‘जन-गण-मन’वर आरोप व टीका करून ‘वन्दे मात स्थान मोठे होणार नाही. ‘जन-गण-मन’ आणि ‘वन्दे मातरम्’ यांमध्ये अशा

तुलना करणे अनुचित आहे. रवीन्द्रनाथांच्या 'जन-गण-मन'ने जरी स्वातंत्र्यलढ्यात काही कामगिरी केली नसली, तरीही रवीन्द्रनाथांच्या इतर गीतांनी वंगभंगविरोधी आंदोलनाला निश्चित दिशा दिली होती.

'जन-गण-मन' हे गीत पंचम जॉर्ज भारतात आले असता गायले गेले, ही वस्तुस्थिती असली, तरी 'मी राजप्रशस्तिगीत लिहिणार नाही, मला अपेक्षित असणारा भाग्यविधाता कोण आहे? हे मी तुम्हाला या गीतातून सांगतो,' अशा एक प्रकारच्या आव्हानात्मक भूमिकेतून रवीन्द्रनाथांनी हे गीत लिहिले, ही गोष्ट नजरेआड करू नये. 'जन-गण-मन'मधल्या 'युग युग धावित यात्री' असे वर्णन असणाऱ्या अनेक ओळी रवीन्द्रनाथांना अपेक्षित असणारा भाग्यविधाता म्हणजे पंचम जॉर्ज नाही, हे स्पष्ट करतात. रवीन्द्रनाथांनी स्वातंत्र्यचळवळीत कुठेही नेतेपद भूषविले नाही. वंगभंगविरोधी आंदोलन वगळता प्रत्यक्ष चळवळीत ते सामील झाले नाहीत. ज्याप्रमाणे क्रांतिकारक अरविंद अचानकपणे अध्यात्ममार्गाकडे वळून पुढे त्यामधील एका उच्चतम स्थानापर्यंत पोहोचले, तसेच रवीन्द्रनाथ हे शिक्षणक्षेत्र, साहित्यक्षेत्र, चित्रकारिता यांमध्ये उच्चस्थानी पोहोचत होते. साहजिकच स्वातंत्र्यलढ्यातला त्यांचा प्रत्यक्ष सहभाग कमी झालेला दिसतो. १९१७ मध्ये कलकत्ता येथे आयोजित केलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या स्वागताध्यक्षाचे मिळालेले पदही त्यांनी सोडले. पुढे १९१८ मध्ये दिल्लीच्या अधिवेशनाचे अध्यक्षपदही त्यांनी नाकारले. त्याचवेळी काँग्रेसमधल्या जहाल व मवाळ गटांना त्यांनी एकत्र आणले. महात्मा गांधीजींचेही अनेक वेळा शांतिनिकेतनमध्ये वास्तव्य झाले होते. स्वातंत्र्यलढ्याच्या अनुषंगाने त्यांच्यामध्ये चर्चाही झाली होती. रवीन्द्रनाथांनी पुढच्या काळात प्रत्यक्ष लढ्यात भाग घेतला नाही, तरीही स्वातंत्र्यलढ्याबद्दल त्यांची भूमिका उदासीन वा तटस्थ राहिलेली नाही.

## रवीन्द्रनाथ आणि बंकिमचंद्र

रवीन्द्रनाथ आणि बंकिमचंद्र या दोघांच्या साहित्यनिर्मितीचा कालखंड वेगवेगळा आहे. बंकिमचंद्रांनी बंगाली, पर्यायाने भारतीय साहित्यातील कादंबरीलेखनाचा पायाच घातला. रवीन्द्रनाथ साहित्यक्षेत्रात येत असताना बंकिमचंद्र उतारवयाकडे झुकलेले होते. कौटुंबिक पार्श्वभूमी असलेल्या आणि त्यानंतर 'आनंदमठ', 'देवी चौधुराणी' यांसारख्या राष्ट्रभक्तीचे तत्त्वज्ञान सांगणाऱ्या कादंबऱ्यांकडून ते 'कृष्णचरित', 'गीतेवरील टीकात्मक भाष्य' अशा आध्यात्मिकतेकडे झुकणाऱ्या लेखनाकडे वळले होते. बंकिमचंद्रांचा संपूर्ण काळ भारतीय साहित्यक्षेत्रात 'बंकिमयुग' म्हणूनच ओळखला जातो. ज्या वेळी बंकिमचंद्र एक कादंबरीकार म्हणून कीर्तीच्या शिखरावर होते, त्यावेळी तरुण रवीन्द्रनाथांचे काव्यवाचन स्वत: बंकिमचंद्रांनी ऐकलेले होते. रवीन्द्रनाथांचे थोरले बंधू सत्येन्द्रनाथ यांच्या 'भारतेर यशोगान' या काव्यावर



'वन्दे मातरम्'चे
जनक
ऋषी बंकिमचंद्र.

'जन-गण-मन'चे
जनक
कविवर्य
रवीन्द्रनाथ.



बंकिमचंद्रांनी १८६८ साली 'बंगदर्शन'मध्ये गौरव करणारा लेख लिहिला हो रवीन्द्रनाथांच्या सुरुवातीच्या गद्यलेखनावर बंकिमचंद्रांची छाप होती किंबहुना काळातील सर्वच तरुण लेखकांवर बंकिमचंद्रांच्या लेखनाचा प्रभाव होता. बंकिमचंद्रां धर्मविषयक मतांवर रवीन्द्रनाथांनी 'भारती' या अंकातून भरपूर टीका केली अ बंकिमचंद्रांनी त्याला 'प्रचार' या अंकातून उत्तरही दिले. रवीन्द्रनाथांचे चरित्रकार दे. खानोलकर म्हणतात,

''भीष्मार्जुनां'मधील युद्धाप्रमाणेच ही उभयतांमधील वाग्युद्धे असत अ त्यांच्याप्रमाणेच या उभयतांचा परस्परांविषयी भाव असे.'' रवीन्द्रनाथांना बंकिमचंद्रां अपार आदर होता. बंकिमचंद्रही रवीन्द्रप्रतिभेचे अपार कौतुक करीत.

साहित्यक्षेत्रात एकमेकांवर टीका करूनही तो वाद विसरून जाऊन स्नेहभ व खिलाडूपणे वागण्याची वृत्ती बंकिमचंद्रांमध्ये होती. रवीन्द्रनाथांच्या 'संध्यास सारख्या अनेक लेखनकृतींचे बंकिमचंद्रांनी कौतुक केले होते. बंकिमचंद्रां व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव रवीन्द्रनाथांवर पुढे कायमच राहिला, तरीही त्यांच्या लेखन प्रभावातून मात्र रवीन्द्रनाथ लवकरच बाहेर पडले. बंकिमचंद्रांविषयी भक्तिभावामुळेच १८९६ मध्ये कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेश रवीन्द्रनाथांनी सर्वांत प्रथम 'वन्दे मातरम्'चे जाहीर गायन केले. पुढे १९० १९०७ मध्ये रवीन्द्रनाथांच्या आवाजातील 'वन्दे मातरम्'च्या ध्वनिमुद्रिकाही निघा

रवीन्द्रनाथ व बंकिमचंद्र ही भारतीय साहित्यक्षेत्रातील दोन शिखरे होती. दोघां विचारशैलीमध्ये, लेखनशैलीमध्ये भिन्नता आहे.

रवीन्द्रनाथांना त्यांच्या आर्थिक स्थितीमुळे तडजोडी कराव्या लागल्या ना बंकिमचंद्रांपेक्षा अधिक मुक्त वातावरण त्यांना मिळाले.

'वन्दे मातरम्' आणि 'जन-गण-मन' या दोन्ही गीतांच्या जन्माच्या वे पार्श्वभूमी परस्परांहून भिन्न आहे. त्यामुळे 'वन्दे मातरम्' आणि 'जन-गण-मन गीतांची एकमेकांशी तुलना करताना बंकिमचंद्र आणि रवीन्द्रनाथ यांच्यावर वैय पातळीवर टिप्पणी करण्यापेक्षा या दोन्ही काव्यांचे वेगळेपण लक्षात घ्यायला

भारतीय संस्कृती मातृप्रधान संस्कृती आहे. 'मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव।' असे क्रमाने गौरवगान आहे. 'वन्दे मातरम्'मध्ये बंकिमचंद्रांनी या भूमीला मातेच्या स्वरूपात पाहिले आहे; तर 'जन-गण-मन' हे ईशगौरव गान म्हणता येईल. बालकाला माता व पिता या दोघांच्याही प्रेमछायेची गरज असते. मातेचे वात्सल्य आणि पित्याचे प्रेम यांच्या प्रगटीकरणामध्ये फरक असला, तरी पित्याच्या अपत्यावरील प्रेमाला कमी लेखता येणार नाही किंवा मातेच्या वात्सल्याशी त्याची तुलना करता येणार नाही.

जगातील जर्मनीसारख्या काही राष्ट्रांच्या राष्ट्रगीतांमध्ये त्यांनी आपल्या देशाला पितृभूमी असेही संबोधले आहे. त्याचप्रमाणे प्राचीन संस्कृतीतील या सृष्टीच्या नियंत्याकडे पितृरूपात पाहून रवीन्द्रनाथांनी मागितलेले हे पसायदानच आहे.

शिवाय 'जन-गण-मन'मधील एका कडव्यात त्यांनी या जगन्नियंत्याला मातेचीही उपमा दिलीच आहे.

**घोर तिमिरघन निविड़ निशीथे पीड़ित मूर्छित देशे ।**

**जाग्रत छिल तव अविचल मङ्गल नतनयने अनिमेषे ।**

**दुःस्वप्ने आतङ्के रक्षा करिले अङ्के स्नेहमयी तुमि माता।**

माझा देश एका भयानक दुःस्वप्नात गढून गेला असताना **तू त्याची स्नेहमयी माता बनून, त्याला मांडीवर घेऊन, त्याचे संरक्षण करत आहेस,** असे रवीन्द्रनाथ म्हणतात.

आज आपल्या राष्ट्रीय मानचिन्हांविषयी - विशेषतः राष्ट्रगीत आणि राष्ट्रध्वज यांच्या योग्य वापराविषयी आपण फारसे गंभीर नाही. भारतीय राज्यघटनेने मान्य केलेल्या राष्ट्रगीताबद्दल आपली विरोधी मते व्यक्त करताना तारतम्य सोडून चालणार नाही. जे राष्ट्रगीत आपल्या देशाचे संपूर्ण जगात प्रतिनिधित्व करते, देशाच्या प्रत्येक प्रसंगी देशवासीयांची अस्मिता जागृत करते, त्या राष्ट्रगीताबद्दल तरुण पिढीच्या मनात संदेह नसावा, तरच राष्ट्रगीताचा आपल्याकडून अभावितपणे किंवा अज्ञानानेसुद्धा अवमान होईल, अशी कोणतीही कृती कोणत्याही भारतवासीयाकडून होणार नाही.

# राष्ट्रगीताचे घटनात्मक स्थान

भारतीय घटनासमितीच्या शेवटच्या सभेमध्ये २४ जानेवारी १९५० या दि अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी 'जन-गण-मन' या गीताची राष्ट्रगीत म्हणून नि केल्याचे जाहीर केले. 'जन-गण-मन' राष्ट्रगीत व्हावे, याचा आग्रह प्रामुख पंतप्रधान पंडित नेहरू यांचाच होता, परंतु तसे कागदोपत्री उल्लेख कुठेही दि नाहीत. घटनासमितीचे अध्यक्ष म्हणून डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी ही घोषणा करत 'आज नेताजी हयात असते, तर त्यांचे मन आणि हृदय आनंदाने उफाळून अ असते', असा उल्लेख केला आणि अप्रत्यक्षरीत्या 'जन-गण-मन'ची राष्ट्रगीत म्ह पहिली निवड सुभाषचंद्रांनीच केली होती, असे सूचित केले.

रवींन्द्रनाथ आणि सुभाषचंद्र बोस या दोघांनाही 'वन्दे मातरम्'विषयी अ भक्तिभाव होता. स्वातंत्र्यप्राप्तीच्यावेळी दोघेही हयात नव्हते, त्यामुळे राष्ट्र निवडताना दोघांची भूमिका नेमकी काय असती, याचा अंदाज बांधणे कठीण अ

स्वत:ला फायद्याच्या ठरतील अशाच सुभाषचंद्रांच्या काही भूमिकांचा व राज्यकर्त्यांनी राजकारणासाठी केला व ते करीत असताना पश्चिम बंगालम मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाने सुभाषचंद्रांप्रमाणे रवीन्द्रनाथांचीही उपेक्षाच के तरीही बंगालच्या सांस्कृतिक क्षेत्रातील रवीन्द्रनाथांचे योगदान नाकारता येणार न

'जन-गण-मन'ला राष्ट्रगीताचे स्थान देऊन भारतीय राज्यघटनेने, घटनासमि रवींन्द्रनाथांना मानवंदनाच दिली आहे. भारतीय राज्यघटनेने राष्ट्रगीताच्या सु वापराबद्दल केलेले नियम त्यासाठीच पाहायला हवेत.

**याबाबत केंद्र सरकारने प्रसिद्ध केलेल्या राष्ट्रगीतासंबंधीच्या नियमावलीच्या पुस्त पुढील नियम दिले आहेत –**

## राष्ट्रगीत गायनासंबंधीचे हुकूम

**(ORDERS RELATED TO THE NATIONAL ANTHEM OF INDIA)**

(१) राष्ट्रगीत पूर्ण किंवा लघुरूपात (वादन/गायन)

(I) (THE NATIONAL ANTHEM : THE FULL AND SHORT VERSION



घटनासमितीचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद व इतर सदस्यांपुढे १५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वातंत्र्यप्राप्तीच्या क्षणी राष्ट्रगीत सादर करताना गायक कलाकार.

रवीन्द्रनाथ ठाकूर या कविवर्यांनी 'जन-गण-मन'हे गीत लिहिले होते. त्यातील पहिले कडवे भारताचे राष्ट्रगीत बनले. त्याचे गायन असे करावे -

**जन, गण, मन अधिनायक जय हे**
**भारत भाग्य-विधाता**
**पंजाब-सिंध-गुजराथ-मराठा**
**द्राविड-उत्कल-वंग**
**विंध्य-हिमाचल-यमुना-गंगा**
**उच्छल-जलधि-तरंग.**
**तव शुभ नामे जागे,**
**तव शुभ आशिष मागे,**
**गाहे तव जय गाथा,**
**जन-गण-मंगल-दायक जय हे**
**भारत-भाग्य-विधाता**
**जय हे, जय हे, जय हे,**
**जय जय जय, जय हे.**

(II) हे राष्ट्रगीताचे पूर्णरूप असून, याचे गायन वा वादन ५२ सेकंदांत पूर्ण व्हावे.

जर लघुरूपात राष्ट्रगीत वाजवायचे असेल, तर राष्ट्रगीताची पहिली व शेवटची ओळ घेऊन एका लघुरूपात हे वाजवले जावे. त्याचे वादन असे करावे -

जन-गण-मन-अधिनायक जय हे
भारत-भाग्य-विधाता
जय हे, जय हे, जय हे,
जय जय जय, जय हे.



हे गायन वा वादन २० सेकंदात पूर्ण व्हावे.

(III) कोणत्या प्रसंगी पूर्ण राष्ट्रगीत वादन करावे व कोणत्या वेळी लघु वाजवावे, याबद्दल स्पष्ट सूचना दिलेल्या आहेत.

**राष्ट्रगीत वाजवणे**
**(PLAYING THE ANTHEM)**

(१) खालील प्रसंगी पूर्ण राष्ट्रगीत वाजवले जावे :

(i) नागरी किंवा सैनिकी खात्याच्या पदावर एखाद्या व्यक्तीसाठी पदग्रहण विशेष कार्यक्रमप्रसंगी,

(ii) राष्ट्रीय मानवंदना (सैनिकी आज्ञेनुसार 'राष्ट्रीय सॅल्यूट - सलामी श ही आज्ञा दिली जाते, तेव्हा; भारताचे राष्ट्रपती, राज्यपाल, लेफ गव्हर्नर हे केंद्र शासनाचे वा राज्य शासनाचे किंवा केंद्रशासित प्रदे प्रमुख उपस्थित असतात त्यावेळी,

(iii) सैन्य प्रदर्शनार्थ - सैन्याच्या प्रदर्शनार्थ एखादी माननीय व्यक्ती अ असताना,

(iv) एखाद्या प्रसंगी राष्ट्रपती एखाद्या शासकीय कार्यक्रमाला उपस्थित रा किंवा एखाद्या जनसमुदायास संबोधित करण्यास येतात, त्यावेळी आगमन झाल्यावर व निर्गमनापूर्वी,

(v) आकाशवाणीवरून, दूरदर्शनवरून राष्ट्रपती राष्ट्राला उद्देशून भाषण क तेव्हा ते संपताच,

(vi) ज्यावेळी राज्यपाल / लेफ्टनंट गव्हर्नर हे औपचारिकरीत्या ए कार्यक्रमास उपस्थित होतात व हे स्थळ त्यांच्या राज्याच्या असते / केंद्रशासित प्रदेशाच्या सीमेत असते, त्यावेळी त्यांचे अ व निर्गमन या दोन्ही प्रसंगी,

(vii) सैन्यप्रदर्शनात राष्ट्रध्वज आणला / उभारला जातो,

(viii) जेव्हा प्रादेशिक सेनादलांना ध्वज प्रदान केला जातो,
(ix) जेव्हा नाविक दलाच्या ध्वजप्रदान प्रसंगी ध्वज उभारला जातो.
(२) ज्यावेळी एखाद्या सन्माननीय व्यक्तीच्या सन्मानार्थ खाना दिला जातो. त्यावेळी लघुरूपात वाजवावे.
(३) ज्यावेळी केंद्र सरकारने एखादा कार्यक्रम / उत्सव साजरा करा, असा खास हुकूम दिला असेल, त्यावेळी राष्ट्रगीत वाजवावे.
(४) सर्वसाधारणपणे पंतप्रधानांच्या उपस्थितीत राष्ट्रगीत वाजवले जात नाही, पण अपवादात्मक प्रसंगी मात्र ते वाजवले जाऊ शकते.
(५) ज्यावेळी वाद्यवृंद राष्ट्रगीत वाजवीत असतो, त्यावेळी प्रथम ड्रमचा आवाज चालू करावा. त्यामुळे श्रोत्यांना राष्ट्रगीत कधी सुरू होणार हे कळण्यास मदत होते. राष्ट्रगीत केव्हा नेमके वाजवले जाणार, याची श्रोत्यांना पूर्वसूचना असली पाहिजे.
उदा. राष्ट्रगीत जेव्हा वाजविले जाणार आहे त्याच ठिकाणी आजूबाजूला मनोरंजनात्मक कार्यक्रम चालू असतील; एखाद्या मेजवानीच्या ठिकाणी मद्यपान चालू असेल, त्याचवेळी राष्ट्रगीतासोबत मानवंदना द्यायची असेल, तर राष्ट्रगीत सुरू होणार, याची पूर्वसूचना ड्रमवादनामुळे मिळेल व बाकी सर्व कार्यक्रम थांबतील.
त्यानंतर सैन्याच्या संचालनाच्या वेळी वाजवतात तसा आवाज ७ बिटस् पर्यंत काढावा. प्रथम हा लहान आवाजात, मग तो वाढवत मोठा करावा व नंतर तसाच लहान करून ७ व्या बिटला थांबवावा. नंतर १ बिट थांबून मगच राष्ट्रगीत सुरू करावे.

## सर्व समूहाने एकत्रित येऊन राष्ट्रगीत गाणे
## (MASS SINGING OF THE ANTHEM)

(१) जेव्हा समूह हा एकत्र राष्ट्रगीत गाणार असतो त्यावेळी पूर्ण राष्ट्रगीत घोषाने (बँडवर) वाजवावे. हे पुढील प्रसंगी उचित आहे.
(अ) ज्या ठिकाणी समारंभाने राष्ट्रध्वज फडकावला जातो. एखाद्या सांस्कृतिक कार्यक्रमात किंवा सैन्याच्या कवायतीखेरीज अन्य एखाद्या समारंभात (अशा वेळी समूहाला बँडच्या तालावर योग्य त्या चालीने राष्ट्रगीत म्हणण्याची माहिती आहे ना याची खात्री करून घ्यावी. शक्यतो आधी याचे प्रशिक्षण देऊन रंगीत तालीम करून घ्यावी. सभागृहात किंवा मैदानात हा कार्यक्रम असेल तर ध्वनिक्षेपकांची संख्या व व्यवस्था योग्य आहे याची खातरजमा करून घ्यावी. सर्व समूहाकडून एकसुरात राष्ट्रगीत गायले जात आहे याची खातरजमा करून घ्यावी.)

(ब) जेव्हा एखाद्या समारंभाला राष्ट्रपती हजर असतात, (अपवाद म्ह
राज्य सरकारने दिलेल्या मेजवान्या) त्यांचे आगमन व निर्गमनाच्या
राष्ट्रगीत वाजवावे.

(२) ज्या ज्यावेळी राष्ट्रगीत समूहगान म्हणून गातात त्यावेळी ते पूर्ण
सेकंदांचे) वाजवावे. समाज गात असतानाच सोबत वाद्यवृंदाने ते वाज

(३) राष्ट्रगीत हे उचित समय पाहून गायले जावे. येथे मोठा समारंभ अ
पाहिजे, असा अट्टहास नाही; पण शक्यतो मंत्री उपस्थित असता हे ग
करावे. अशा वेळी समूहाच्या गायनासोबत वाद्यवृंद असलाच पा
अशी सक्ती नसावी. पण जनसमूह मोठा असेल, तर तो असणे श्रेय
असते.

(४) नेमक्या कोणत्या प्रसंगी राष्ट्रगीत वाजवले जावे अथवा गावे याची तपशी
यादी देणे शक्य नाही. परंतु कोठेही जेव्हा समाज एखाद्या विधायक
एकत्रित झाला असतो, तेव्हा राष्ट्रगीत गायन/वादन यास हरकत
राष्ट्रगीताचा योग्य तो आदर राखून ते सन्माननीयरीत्या गायले / वा
जाणे हे महत्त्वाचे आहे, कारण या गीताच्या माध्यमातून आपण मातृभू
वंदन करत आहोत. त्यामुळे त्याचा योग्य तो आदर राखणे मह
आहे.

(५) शाळांमधून दैनंदिन कार्यक्रमाची सुरुवात समूहाने राष्ट्रगीत गाऊन क
शाळाधिकाऱ्यांनी राष्ट्रगीत गाणे हे लोकप्रिय व्हावे यासाठी शालेय कार्य
त्याच्या शिक्षणाची पुरेशी तरतूद करावी. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या
राष्ट्रीयत्वाची भावना वाढीस लागून राष्ट्रगीत व राष्ट्रध्वज यांबद्दल
निर्माण होईल.

**परदेशांची राष्ट्रगीते वाजवणे**

**(PLAYING OF FOREIGN ANTHEMS)**

(१) जेव्हा परदेशातून माननीय व्यक्ती भारताचे भेटीस येतात त्यावेळी
राष्ट्रीय मानवंदना देणे अपेक्षित असते. अशा वेळी ज्या देशाचे सन्म
पाहुणे आले आहेत, त्या देशाचे राष्ट्रगीत पूर्ण वाजवावे. त्यानंतर भ
पूर्ण राष्ट्रगीत वाजवावे.

(२) ज्यावेळी परदेशी दूतावास किंवा परराष्ट्रीय खाते यांच्या वतीने
चित्र किंवा इतर सांस्कृतिक कार्यक्रम भारतात साजरे केले ज
त्यावेळी ज्या देशाने अशा कार्यक्रमांचे आयोजन केले आहे
देशाच्या राष्ट्रगीतासोबत भारताचे राष्ट्रगीत गावे / वाजवावे. प्रथ
देशाचे वाजवावे व त्यानंतर लगेच आपले राष्ट्रगीत वाजवावे.

(३) जेव्हा परदेशातील मंत्री त्यांच्या देशाचे राष्ट्रीय दिवस आपल्या देशात (उदा. स्वातंत्र्यदिन इत्यादी) साजरा करतात, तेव्हा तो दिवस साजरा करणाऱ्या देशाचे राष्ट्रगीत प्रथम वाजवावे. जर या प्रसंगी राष्ट्रपती उपस्थित राहणार असतील किंवा समारंभात मुख्य अतिथी म्हणून केंद्र सरकारचे कॅबिनेट दर्जाचे मंत्री किंवा केंद्रशासित प्रदेशाचे लेफ्टनंट गव्हर्नर अशा दर्जाचे अतिथी उपस्थित असतील, तर प्रथम भारतीय राष्ट्रगीत वाजवावे. त्यानंतर ज्या देशाने या कार्यक्रमाचे यजमानपद स्वीकारले असेल त्या राष्ट्राचे गीत वाजवावे. याच पद्धतीने अशा प्रसंगी जर मेजवानी / भोजनाचा कार्यक्रम आयोजित केला असेल, त्या प्रसंगीदेखील वरील दर्जाचे अतिथी हजर असता प्रथम भारतीय राष्ट्रगीत व नंतर यजमान देशाचे राष्ट्रगीत वाजवावे.भारत सरकारतर्फे या कार्यक्रमाचे आयोजन केले असेल, तर प्रथम भारतीय राष्ट्रगीत एकदा वाजवल्यास पुन्हा ते वाजवण्याची जरुरी नाही. अर्थात हा नियम मेजवानीस लागू आहे.

टीप - कलम IV मध्ये वर्णन केल्याप्रमाणे राजकीय शिष्टाचाराप्रमाणे परदेशी राष्ट्रगीताच्या आधी किंवा नंतर ज्यावेळी राष्ट्रगीत वाजवण्याचा प्रसंग येतो, अशा वेळी दोन्ही राष्ट्रांची गीते एकाच वेळी वाजवली जाणार नाहीत, याची काळजी घ्यावी. तथापि समूहाने जर राष्ट्रगीत गाण्याची वेळ आली, तर त्या देशाचे राष्ट्रगीत गाण्याच्या आधी किंवा नंतर लगेच भारतीय राष्ट्रगीत वाजवले जावे. असा प्रसंग जेव्हा त्या देशातील महनीय व्यक्ती व त्यांच्या सोबत आलेले शिष्टमंडळ हे स्वत: त्यांचे राष्ट्रगीत गाणार असतील, तेव्हाच येऊ शकतो.

**सर्वसाधारण**

**GENERAL**

१. ज्यावेळी राष्ट्रगीत गायले / वाजवले जाते, त्यावेळी सर्व उपस्थित व्यक्तींनी ताठ उभे राहावे. (सैन्यातील सावधान या आज्ञेस अनुसरून) अर्थात एखाद्या माहितीपटात किंवा वार्तांकनात राष्ट्रगीत चित्रमुद्रित केले गेलेले दाखवले जात असेल, अशा वेळी उभे राहण्याची गरज नाही.

   कारण काही व्यक्ती उभ्या राहाण्याने मागील व्यक्तींना रजतपटावरील दृश्य पाहण्यात व्यत्यय येऊ शकतो, यामुळे बेशिस्त व गोंधळ होण्याची शक्यता असते. त्यामुळे राष्ट्रगीताचा अवमान होतो, याची जाणीव ठेवावी.

२. ज्या प्रसंगी राष्ट्रगीत गाऊन राष्ट्रध्वजाला मानवंदना द्यायची असेल, त्या प्रसंगी आलेल्या लोकांनी स्वत:हून शिस्तीत उभे राहावे व योग्य रीतीराष्ट्रगीत म्हटले जाईल, याची काळजी घ्यावी.

या देशाच्या विद्यमान कायद्यानुसार राष्ट्रगीत गाण्याची सक्ती कोणत्याही व्यक्ती करता येत नाही. एखादी व्यक्ती राष्ट्रगीत गायले / वाजवले जात असताना शिस्तीत केवळ स्तब्ध व ताठ उभी राहात असेल, तर ते राष्ट्रगीताला मान देण्य द्योतक आहे. केवळ राष्ट्रगीत गात नाही म्हणून ती व्यक्ती राष्ट्रगीताचा अनादर क असे समजले जाऊ नये. घटनेच्या कलम ५१ ए यानुसार भारताच्या प्रत्येक नागरिक हे कर्तव्य आहे की, घटनेच्या नियमांचे त्याने पालन करावे. राष्ट्राचे सन्मान समज जाणाऱ्या चिन्हांचा - राष्ट्रध्वज, राष्ट्रगीत यांचा आदर राष्ट्रगीत गायन व वादन समयी स्तब्ध व ताठ उभे राहून व्यक्त केला जातो. राष्ट्रगीत स्वत: गाण्यानेच तो अ दर्शवला जातो, असे समजण्याचे कारण नाही.

## राष्ट्रगीताचा मान राखण्याबाबत जागरूकतेचा अभाव

भारतीय राज्यघटनेने राष्ट्रीय मानचिन्हांच्या वापराबद्दल स्पष्ट नियमावली दि असूनही या नियमांचे पालन अनेकवेळा होत नाही. त्यातील बहुतांशी वेळा अभावित नियम तोडले जातात. त्यात अवमानाचा हेतू नसतो, परंतु अशा अभावितपण जेव्हा बेफिकीर वर्तनाची जोड मिळते, तेव्हा तो गुन्हाच मानला पाहिजे. अशा न्यायालयात खटले दाखल केल्यास भारतीय राज्यघटनेने दिलेले संकेत मोडून मुद्दा वेगळे काही करण्याचा अट्टहास काही व्यक्तींकडून किंवा संस्थांकडून केला ज

भारतीय राज्यघटनेने रवीन्द्रनाथांच्या मूळ 'जन-गण-मन'पैकी फक्त पहि कडव्याला राष्ट्रगीत म्हणून मान्यता दिली आहे. केवळ बारा ओळींच्या राष्ट्रगीता उच्चाराबाबत प्रत्येकाने जागरूक असायला हवे. दुर्दैवाने यातील अनेक शब्द स रीतीने उच्चारले जातात. 'उत्कल','उच्छल' या शब्दांची अदलाबदल तर नेह होते. गेली काही वर्षे राष्ट्रगीताच्या दुसऱ्याच ओळीतील 'पंजाब, सिंध, गुज मराठा' या ओळीतील सिंध या शब्दावरून वाद निर्माण झाले आहेत. रवीन्द्रना मूळ गीतातच सिंध असाच उल्लेख केला असावा. रवीन्द्रनाथांच्या गद्य कविताव स्वरूपातील 'जन-गण-मन'चे त्यांच्या स्वत:च्या आवाजातील जे ध्वनिमुद्रण उप आहे, त्यातही ते 'सिंध' असेच म्हणतात. स्वत: रवीन्द्रनाथांनी जो 'जन-गण- चा इंग्रजी अनुवाद केला आहे, त्यातही 'Sind' असेच स्पेलिंग आहे. स्वा मिळण्यापूर्वी अखंडित भारतामध्ये रवीन्द्रनाथांनी हे गीत लिहिले. सिंध प्रांत त्या भारताचाच एक अविभाज्य घटक होता. १९४७ साली स्वातंत्र्य मिळताना भा विभाजन झाले व सिंध प्रांत पाकिस्तानात गेला. त्यावेळी रवीन्द्रनाथ हयात न या सिंध प्रांताचे नावही त्याच प्रदेशातून वाहणाऱ्या सिंधू नदीवरून पडले अ इतिहासाला ज्ञात असणारी भारतातील सर्वांत प्रगत आणि प्राचीन सिंधू संस्कृती नदीच्या खोऱ्यात बहरली. आज भारताच्या काही भागातून सिंधू नदी वाहून पु

पाकिस्तानात जाते. सिंध प्रांत आज पाकिस्तानचाच भाग आहे. सिंधूवरूनच 'हिंदू' या शब्दाची उत्पत्ती झाली असल्याचे काही संशोधक मानतात.

१९४७ साली स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पाकिस्तानमध्ये गेलेल्या सिंध प्रांताचा उल्लेख भारताच्या राष्ट्रगीतात कशाला हवा? असा प्रश्न अनेक विचारवंत उपस्थित करतात. त्यामुळे 'पंजाब, सिंधू, गुजरात, मराठा' असे अलीकडे म्हटले जाऊ लागले आहे. सरकारी ध्वनिमुद्रणातही सिंध असेच गायले गेले आहे. तार्किक दृष्टीने 'सिंध' ऐवजी 'सिंधू' असे म्हणणे योग्य वाटले, तरी त्यामुळे रवीन्द्रनाथांच्या मूळ गीताच्या आशयाला धक्का तर लागत नाही ना, याविषयी विचार केला पाहिजे.

या ओळीत पंजाब, गुजरात, मराठा, द्राविड (द. भारत), उत्कल (ओरिसा), वंग अशी भौगोलिक प्रांतांची नावे असताना त्यामध्ये सिंधू हे नदीचे नाव कसे येऊ शकेल? सिंधू संस्कृतीतून सिंधू असा उल्लेख इथे केल्याप्रमाणे वाटत नाही. पुढच्या ओळीत 'विंध्य', 'हिमाचल' या दोन पर्वतनामांनंतर 'यमुना' व 'गंगा' असे दोन नद्यांचे उल्लेख येतात. रवीन्द्रनाथांना जर सिंधू नदीचाच उल्लेख करायचा असता, तर तो या ठिकाणी शोभून दिसला असता.

त्याविषयी राष्ट्रगीतात 'सिंधू' नव्हे तर 'सिंध' असा शब्दप्रयोग केला जावा, अशी मागणी करणारी जनहितयाचिका छायाचित्रकार प्राध्यापक श्रीकांत मलुष्टे यांनी मुंबई उच्च न्यायालयात केली होती. यावर 'सिंध' व 'सिंधू' या राष्ट्रगीतातील शब्दप्रयोग कोणता व शब्दप्रयोगाची चूक लक्षात आल्यावर सरकारने ती चूक का सुधारली नाही, अशी विचारणा करीत त्याबाबतीत आपले म्हणणे मांडण्याचे आदेश न्यायालयाने केंद्र सरकारला दिले होते. न्यायालयाच्या आदेशानंतर ५ ऑक्टोबर २०११ रोजी केंद्रीय गृह मंत्रालयाने न्यायालयात प्रतिज्ञापत्र सादर केले व राष्ट्रगीतात वापरले जाणारे दोन्ही शब्दप्रयोग योग्य असल्याचा दावा केला. राष्ट्रगीत गाताना आणि वाद्यवृंदावर वाजविताना 'सिंधु' या शब्दाचा वापर केला जातो, तर लिखित राष्ट्रगीतामध्ये 'सिंध' या शब्दाचा प्रयोग केला जातो. शिवाय 'सिंध' व 'सिंधु' या दोन्ही शब्दप्रयोगांचा अर्थही सारखाच असून दोन्ही शब्दप्रयोग सिंधु नदी अथवा सिंधी समाजाला अधोरेखित करतात, असेही प्रतिज्ञापत्रात स्पष्ट करण्यात आले आहे. राष्ट्रगीतातील 'सिंध' या शब्दाऐवजी तेथे 'काश्मीर' हा शब्दप्रयोग करावा, अशी मागणी करणारी याचिका फेटाळून लावताना सर्वोच्च न्यायालयाने २००५ मध्ये दिलेल्या निकालाचा दाखलाही केंद्राने या प्रतिज्ञापत्रात दिला आहे. देशाची प्रादेशिक सीमा बदलली की राष्ट्रगीतात त्यानुसार बदल करणे बंधनकारक नाही, असा निकाल सर्वोच्च न्यायालयाने दिला होता. राष्ट्रगीतातून 'सिंध' हा शब्द गाळला, तर केंद्र सरकारने त्याबाबत काढलेल्या अधिसूचना आणि सर्वोच्च न्यायालयाच्या निकालाचा अवमान केल्यासारखे होईल. नोव्हेंबर १९५१ साली गृहमंत्रालयाने प्रसिद्ध केलेल्या 'अवर नॅशनल अँथम' या पुस्तिकेत 'सिंधु' शब्दप्रयोग केला आहे. त्यामुळे

गृहमंत्रालयाच्या संकेतस्थळावरील आणि पुस्तिकेतील अनुक्रमे 'सिंध' व 'सिंधु
शब्द योग्य असल्याचा गृहमंत्रालयाचे सचिव प्रदीप कुमार पांडे यांनी प्रतिज्ञाप
केला. (बातमी - महाराष्ट्र टाईम्स, ७ ऑक्टोबर २०११)

ज्याप्रमाणे 'वन्दे मातरम्'मध्ये 'के बले मा तुमि अबले'च्या जागी 'अबला
मा एतो बले' किंवा 'सप्त कोटी'च्या जागी 'त्रिशत कोटी' आणि कालांतराने '
कोटी' असे बदल झाले, ते मान्यही झाले, तसे बदल 'सिंध' व 'सिंधु'चा अप
वगळता 'जन-गण-मन'मध्ये झाल्याचे दिसत नाही.

सरकारी पातळीवर यात बदल झाले नसले, तरी काही संस्था किंवा व्य
बेकायदेशीरपणे या गीतात शब्दबदल करून त्याचा सार्वजनिक पातळीवर दुरु
करताना दिसतात.

अगदी अलीकडेच जानेवारी २०११ मध्ये उत्तर प्रदेशातील लखनौपासून
किलोमीटर अंतरावर आंबेडकरनगर जिल्ह्यातील एका खाजगी शाळेने राष्ट्रगीता
शब्दांमध्ये काही बदल करून ते विद्यार्थ्यांकडून गाऊन घेतले. शाळेचे संचा
रघुनाथ सिंह यांनी हा बदल करताना 'काळाच्या संदर्भात या गीतातील काही
लोकशाहीच्या दृष्टीने गैर ठरत आहेत, म्हणून हे शब्द बदलले', असे समर्थन

'भारतभाग्यविधाता' या शब्दाच्या ऐवजी 'स्वर्णिम्‌भारतनिर्माता' असा
केला आहे. 'अधिनायक' हा शब्दही राजेशाहीदर्शक आहे म्हणून बदलला,
संस्थाचालक म्हणतात. या घटनेची नोंद घेऊन आंबेडकर जिल्ह्याच्या शि
संचालकांनी १९७१ च्या कलम २ नुसार संस्थाचालकांवर कारवाई करण्यास सु
केली आहे.

ज्याप्रमाणे राष्ट्रगीताच्या मूळ संहितेमध्ये वा शब्दांमध्ये कोणताही बदल
येत नाही, त्याचप्रमाणे घटनेनुसार निवडलेले 'जन-गण-मन'चे पहिले कडवे म्ह
आजच्या राष्ट्रगीताचे गायन हे ५२ सेकंदांत व्हायला हवे. ध्वनिमुद्रिकांमध्ये
पालन केलेले आहे. मात्र समूहस्वरात, सार्वजनिक सभांत त्याचे गायन होत अस
हा नियम पाळला गेल्याचे दिसत नाही. राष्ट्रगीताच्या सुयोग्य वापराबद्दल
असलेल्या नियमांमध्ये अनेक पळवाटा निघतात. राष्ट्रगीताच्या उपयोगाच्या
पाळावयाचे काही संकेत आहेत. हे जरी नियम किंवा कायद्याच्या चौकट
बसणारे नसले, तरी आपल्या राष्ट्रगीत या राष्ट्रीय अस्मिता दर्शविणाऱ्या महत्त्
घटकाचा अवमान होऊ नये, यासाठी दिलेल्या या सूचना आहेत.

जुलै १९८५ मध्ये केरळमधील 'येहोवाज् विटनेसेस' (Jehov
witnesses)या केरळच्या धार्मिक पंथाच्या शाळेत आयोजित केलेल्या
कार्यक्रमात शाळेतील मुले राष्ट्रगीत गाण्यात सहभागी झाली नाहीत. ह्यासाठी
शाळेतून काढून टाकण्याची कारवाई स्थानिक शिक्षण खात्यातील उपनिरी
केली. त्यानंतर केरळ सरकारच्या सार्वजनिक सूचना खात्याने (Director of P

Instruction, Kerla) कलम १९ (१) ए आणि २५ (१) नुसार तसे परिपत्रकही काढले होते. या कारवाईला बिजोई इमेन्युअल या पालकाच्या नेतृत्वाखाली काहीजणांनी न्यायालयात आव्हान दिले. पुढे हा खटला सर्वोच्च न्यायालयापर्यंत चालून ११ ऑगस्ट १९८६ रोजी सर्वोच्च न्यायालयाने केरळ उच्च न्यायालयाचा निकाल रद्द करून, विद्यार्थ्यांवर केलेली कारवाई रद्द करण्याचे आदेश दिले व या मुलांना परत शाळेत प्रवेश द्यावा, असा निर्णय दिला. ही मुले शाळेतील एरवीच्या राष्ट्रगीत गायनाच्या वेळी स्तब्ध उभी होती. तसेच घटनेने दिलेल्या मूलभूत अधिकारांमधील धार्मिक श्रद्धेचे पालन करणे या गोष्टीशीही या घटनेचा संबंध सर्वोच्च न्यायालयाने लावला. 'आमच्या देशाची परंपरा सहिष्णुतेची आहे, आमचे तत्त्वज्ञान सहनशीलता शिकवते. आमची राज्यघटनाही सहनशीलतेचे आचरण करावे, हेच सांगते. आपण त्या तत्त्वाचा अवलंब करण्यात कुचराई करू नये', असा उल्लेखही निकालपत्रात करण्यात आला आहे. Our Tradition teaches tolerance, our philosophy teaches tolerance, our constitution practices tolerance, let us not dilute it. (संदर्भ : बिजोई इमॅन्युमल वि. केरळ सरकार सुप्रिम कोर्टातील खटला क्र. ७४८ सन १९८७ चा निवाडा)

२००४ मध्ये एका कार्यक्रमात बिहारच्या तत्कालीन मुख्यमंत्री राबडीदेवी व त्यांचे पती लालूप्रसाद यादव हे एका जाहीर कार्यक्रमात राष्ट्रगीत चालू असताना बसून राहिल्यामुळे त्यांच्यावर गुन्हा दाखल झाला होता. या गुन्ह्यावर इंदोरच्या न्यायालयाने दिलेला निकाल आश्चर्यचकित करणारा होता. 'राष्ट्रगीत सुरू झाल्यानंतर उठून उभे राहणे हे नैतिक कर्तव्य आहे; मात्र उभे राहिले नाही तरी १९७१ च्या कायद्यानुसार, तसेच २००२ मधील नवीन ध्वजसंहितेनुसार प्रथमदर्शनी हा गुन्हा ठरत नाही. अशी कृती गुन्हा असल्याचे या कायद्यात कोठेही नमूद करण्यात आलेले नाही. राष्ट्रगीत सुरू असताना उभे राहणे बंधनकारक नाही,' असे न्यायदंडाधिकारी नरेंद्र जैन यांनी निकालात म्हटले होते.

राष्ट्रगीत चालू असताना सावधान स्थितीत उभे राहावे. त्यावेळी अन्य काहीही करू नये, हा साधा संकेत आहे. त्याची सक्ती करायची वेळच येऊ नये. राष्ट्रगीत देशाचा मानबिंदू आहे. या देशाचा कोणताही नागरिक तो सुशिक्षित असो वा अशिक्षित, त्याने राष्ट्रगीताचा मान आपणहून राखला पाहिजे. राष्ट्रगीताला मानवंदना देणे, ते चालू असताना त्याचा सन्मान राखणे, ही वरवर साधी दिसणारी कृती नागरिकाच्या दृष्टीने खूप मोठी आहे. राष्ट्रगीताचा मान राखणे म्हणजे ते स्वातंत्र्य मिळवण्यासाठी सर्वस्व अर्पण करणाऱ्यांबद्दल आणि भारताचे स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठी प्राणांची बाजी लावणाऱ्या भारताचे संरक्षण दल, पोलीस दल या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे होय.

प्रकरण ९ :

# ‘जन-गण-मन’चे संगीत

‘जन-गण-मन’ची संगीतरचना स्वत: रवीन्द्रनाथांचीच आहे. १९११ स कलकत्त्याच्या अधिवेशनात त्यांनी स्वत:च समूहासमवेत त्याचे गायन केले रवीन्द्रनाथांनी लिहिलेल्या व स्वत:च्या संगीतरचनेत बांधलेल्या संगीतरचना कधीही बदल केले जात नाहीत. रवीन्द्रसंगीताच्या बाबत हा अलिखित संकेत ‘जन-गण-मन’चे रवीन्द्रनाथांच्या आवाजातील जे ध्वनिमुद्रण उपलब्ध आहे काव्यवाचनाप्रमाणे आहे. ते गायन नाही. हे ध्वनिमुद्रणही त्यांच्या अगदी उतारवय आहे. आज प्रचलित असलेली चाल रवीन्द्रनाथांनीच बांधलेली आहे व ‘विश्वभारती निघालेल्या समूहस्वरातील ध्वनिमुद्रिकांवर तसा उल्लेख आहे.

१९१९ मध्ये मदनापल्ली येथे रवीन्द्रनाथांनी ‘जन-गण-मन’चे इंग्रजी भा केले. मदनापल्लीच्या महाविद्यालयाचे प्राचार्य जेम्स कझिन्स यांच्या पत्नी मा कझिन्स यांनी मूळ ‘जन-गण-मन’ची संगीतरचना व स्वरलिपी पाश्चात्त्य प तयार केली. ती तयार करत असताना रवीन्द्रनाथांच्या मूळ संगीतरचनेला धक्का लावला नाही. मूळ संगीतरचना व गीतातील शब्दांचे अर्थ त्यांना रवीन्द्रनाथांनीच समजून दिले होते.

११ सप्टेंबर १९४२ रोजी हॅम्बुर्ग येथे ‘जर्मन इंडियन सोसायटी’च्या उद्घाट कार्यक्रमात डॉ. अम्बिक मुजूमदार यांनी केलेल्या संगीतरचनेत व डॉ. एगेल यांच्या संचलनाखाली हॅम्बुर्ग रेडिओ चेंबरच्या ऑर्केस्ट्राने ‘जन-गण-मन’चे सादरी केले.

नेताजी सुभाषचंद्रांच्या आझाद हिंद सेनेने ‘शुभ सुख चैन की बरखा बरसे भाग है जागा’ हे ‘जन-गण-मन’च्या आधारावर ‘जन-गण-मन’शी बहुतांशी असणारे गीत राष्ट्रगीत म्हणून स्वीकारले होते. आझाद हिंद सेनेच्या वाद्यवृंदाचे कॅप्टन रामसिंग यांनी ही संगीतरचना बांधली होती.

‘वन्दे मातरम्’प्रमाणे ‘जन-गण-मन’ची फारशी ध्वनिमुद्रणे निघाली नाहीत मोजकी ध्वनिमुद्रणे निघाली, त्या सर्वांची संगीतरचना एकच आहे. गायनशैलीत थोडाफार फरक आहे. के. अश्वत्थामा नावाच्या गायिकेने दक्षिण भारतीय



मा. कृष्णराव




गायिका
के. अश्वत्थामा

[illegible]नुसार स्वरांना हेल देत केलेले गायन ध्वनिमुद्रिकेवर उपलब्ध आहे. ते काहीसे [illegible] ध्वनिमुद्रिकांपेक्षा वेगळे आहे.

१४ ऑगस्ट १९४७ रात्री १२ वाजता यावेळी भारतीय स्वातंत्र्यप्रदानाचा ऐतिहासिक सोहळा दिल्लीमध्ये चालू असतानाच मुंबईमध्ये गेट वे ऑफ इंडिया परिसरात एका सोहळ्याचे आयोजन केले होते. समोर असलेल्या प्रसिद्ध ताज हॉटेलमध्ये 'मिकी कोरीया बँड' हा जॅझ संगीतातील आंतरराष्ट्रीय कीर्तीचा वाद्यवृंद राष्ट्रध्वजाला संगीतातून मानवंदना देण्यासाठी तयार होता. या वाद्यवृंदाचे प्रमुख मिकी कोरीया यांनी आपल्या [illegible] सहकाऱ्यांसमवेत वेगळ्या सुरावटीत अतिशय जोरकसपणे 'जन-गण-मन'चे सादरीकरण केले. (संदर्भ : 'A brief history of everything' - Naresh Fernandes, 'Lounge' १.१०.११ )

## मास्टर कृष्णराव आणि 'जन-गण-मन'

मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर यांनी 'वन्दे मातरम्' राष्ट्रगीत होण्यासाठी पंडित नेहरू यांच्याशी केलेला सांगीतिक संघर्ष प्रसिद्ध आहे. तत्कालीन संसद सदस्य व घटना समितीच्या सदस्यांसमोर त्यांनी ध्वनिमुद्रणांच्या सहाय्याने प्रात्यक्षिके दिली. या संघर्षात पंडित नेहरूंकडून 'जन-गण-मन'ला झुकते माप दिले जाणार आहे, याचा अंदाज त्यांना आला होता. त्यावेळी त्यांनी 'जन-गण-मन'चीही दोन ध्वनिमुद्रणे तयार केली होती. त्यातील बाकी संगीतरचनेत कोणताही बदल न करता 'भारत भाग्य विधाता' या तीन शब्दांची संगीतरचना मध्य सप्तकाकडे जाणारी होती. त्याऐवजी ती तार सप्तकाकडे जाणारी त्यांनी केली. 'भारतभाग्यविधाता' हा या गीताचा केंद्रबिंदू असल्यामुळे ते शब्द गात असताना त्या शब्दांचे संगीत मध्य किंवा मंद्र सप्तकाकडे जाणारे नसावे, अशी भूमिका मा. कृष्णरावांनी मांडली होती.

ही ध्वनिमुद्रणे फक्त घटनासमितीसमोर वाजविण्यासाठी कच्च्या ध्वनिमुद्रिकेच्या


पं. दिनकर कायकिणी


गायिका डॉ. सुमती मुटाटकर

स्वरूपात केलेली असल्यामुळे ती बाहेर कोठेही वितरित झाली नाहीत व त्यामु
त्याचा प्रचारही झाला नाही.

भारतीय राज्यघटना अमलात आल्यानंतर म्हणजे २६ जानेवारी १९५० 'जन-गण-मन' ला राष्ट्रगीताचे स्थान प्राप्त झाले. सरकारी पातळीवर योग्य संगीत करून ध्वनिमुद्रण करण्याची जबाबदारी दिल्ली 'आकाशवाणी' केंद्राकडे दे आली. आकाशवाणी केंद्राने आंतरराष्ट्रीय संकेतांनुसार दोन ध्वनिमुद्रणे तयार के त्यावेळी ७८ गतीच्या ध्वनिमुद्रिका निघत असत. याच प्रकारात 'जन-गण-मन 'वन्दे मातरम्'चे ध्वनिमुद्रण मुद्रित केले गेले. यांतील एक ध्वनिमुद्रण समू पद्धतीचे व दुसरे सैन्यदलाच्या वाद्यवृंदाचे आहे. समूहस्वरातील ध्वनिमुद्रणा वाद्यवृंदाची साथ नाही. घटनेतील तरतुदीप्रमाणे ही ध्वनिमुद्रणे ५२ सेकंदांची अ समूहस्वरातील ध्वनिमुद्रणात मुख्य पुरुष स्वर पंडित दिनकर कायकिणी व मुख्य स्वर डॉ. सुमती मुटाटकर यांचा आहे. हे दोन्ही नमुने संसदीय समितीने मंजूर व ग्रामोफोन कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड या कंपनीला ७८ वेगाच्या पद्धत ध्वनिमुद्रिका बनवण्याचे काम सोपवले गेले व ध्वनिमुद्रिकांवर एच.एम.व्ही कं लेबलही लावले गेले.

आकाशवाणीची त्या काळात संपूर्ण देशभर सुमारे ८०० केंद्रे होती. ह्या केंद्रांवर प्रक्षेपण सुरू होताना सुरुवातीला व रात्री प्रक्षेपण थांबवताना ही ध्वनि वाजविली जाण्याचे निश्चित केले गेले. परंतु आकाशवाणीवरून 'जन-गण-म अधिकृत ध्वनिमुद्रिका वाजवली जात नाही. 'वन्दे मातरम्'चे ध्वनिमुद्रण प्रक्षेपण सुरू होताना रोज सकाळी वाजवले जाते.

या संदर्भात पंडित दिनकर कायकिणी यांनी आपली आठवण सांगितल म्हणतात, ''पुढे १९५३-५५ या काळात आम्ही रेडिओ कलाकारांनी कामाचा म्हणून खासदारांना संसदेत जाऊन राष्ट्रगीत गायनाचे धडे दिले. दर शुक्रवारी



बंगाली गायक व संगीतकार
हेमंतकुमार.



संगीतकार
वसंत देसाई.

[illegible] हा उपक्रम चाले. कुठचाही संदर्भ-सूर नसताना पटकन् राष्ट्रगीत व राष्ट्रीय गीत [illegible] सुरू करावे व एक मिनिटाच्या आत कसे संपवावे, याचे प्रशिक्षण आम्ही देत [illegible] आज देशभरातले लाखो भारतवासीय त्याच पद्धतीने स्वातंत्र्य/प्रजासत्ताकदिनी [illegible] करतात. राष्ट्रगीत गायन हे जबाबदारीने, पूर्ण गांभीर्याने आदर व सन्मानपूर्वक [illegible] असते. विशेष प्रसंगी फक्त त्याचे समूहगानच अपेक्षित आहे. आजही 'वंदे [illegible]' किंवा 'जन-गण-मन' आपण लक्षपूर्वक ऐकलेत व त्यात लपलेल्या [illegible] शोध घेतलात, तर तो सैनिकांच्या संचलनाच्या वेळी पडणाऱ्या पावलांचा [illegible]. ती चाल संचलन डोक्यात ठेवून केलेली आहे, नृत्य नव्हे.''

१९५२ मध्ये स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेचच आलेल्या बंगाली चित्रपट 'उदय पॅथे' [illegible] त्याचे हिंदी रूपांतर 'हमराही' या चित्रपटामध्ये पहिल्यांदाच 'जन-गण-मन' पूर्ण [illegible] गायले गेले होते. बिमल रॉय या प्रसिद्ध दिग्दर्शकाच्या या पहिल्या [illegible]चे कथानक आझाद हिंद सेनेच्या पार्श्वभूमीवर घडणारे होते. प्रसिद्ध संगीतकार [illegible] हेमंतकुमार (मुखर्जी) यांनी त्याचे गायन केले होते. चित्रपटात एकूण दोन [illegible] हे गीत वापरण्यात आले होते. त्यातील एक पूर्ण शब्दोच्चाराचे व दुसरे [illegible] स्वरूपात होते. तत्कालीन सेन्सॉरने हा चित्रपट संमत करताना या गीताला [illegible] घेतला नव्हता; परंतु घटनेनुसार 'जन-गण-मन'च्या एकाच कडव्याला [illegible] म्हणून मान्यता असल्यामुळे पुढे चित्रपटातून हे गीत वगळण्यात आले. [illegible]कडेच नेताजी सुभाषचंद्रांच्या शेवटच्या दहा वर्षांच्या कालखंडाचा वेध घेणाऱ्या [illegible] बेनेगल दिग्दर्शित 'नेताजी द फरगॉटन हीरो' या चित्रपटात 'आझाद हिंद सेनेचे' [illegible] सुख चैन' हे गीत वापरले आहे.

सरकारी पातळीवर या ध्वनिमुद्रणाचा प्रसार करण्यासाठी फारसे प्रयत्न झालेले [illegible] नाहीत. १९६२ साली भारत-चीन युद्धप्रसंगी नागरिकांमध्ये देशभक्ती जागृत [illegible]साठी काही योजना करण्यात आल्या. त्यातील काही १९६५ मध्ये झालेल्या




टाइम्स म्युझिक वितरित व भारतबाला प्रॉडक्शन निर्मित ध्वनिचित्रफीत.

भारत-पाक युद्धाच्या वेळी अमलात आणल्या गेल्या. राष्ट्रगीत तसेच अन्य देशभक्तिपर गीते मोठ्या समूहाकडून विशेषत: विद्यार्थ्यांकडून गाऊन घेण्याची यो त्यात होती. संगीतकार वसंत देसाई यांच्या मार्गदर्शनाखाली 'एक सूर, एक ता नावाने मुंबई, पुणे यांसारख्या काही शहरांमध्ये एका वेळी पन्नास हजार ते एक विद्यार्थ्यांनी समूहगायन केले. या कार्यक्रमात वसंत देसाई 'जन-गण-मन'चे अधिक सुविहितपणे विद्यार्थ्यांकडून करून घेत.

चित्रपट हे जनतेच्या मनोरंजनाचे एक महत्त्वाचे साधन आहे. चित्रपट होताना वा संपताना राष्ट्रगीताचे ध्वनिमुद्रण देशातील प्रत्येक चित्रपटगृहात व जाऊ लागले. सुरुवातीला फक्त ध्वनिमुद्रिका वाजवली जाई. नंतर मात्र आ फडकणाऱ्या तिरंग्याच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रगीताची ध्वनिचित्रफीत केली गेली. कृष्णधवल असणारी चित्रफीत पुढे रंगीत स्वरूपात दाखवली जाऊ लागली.

१९६५ च्या युद्धाच्या काळात देशभक्तीने भारलेल्या वातावरणात न शिस्तबद्धपणे उभे राहात होते. पुढे मात्र राष्ट्रगीत चालू असतानाही लोक चित्रपटगृ बाहेर पडत. त्यामुळे १९८० मध्ये ही पद्धत थांबवण्यात आली. १९९ सुमारास बहुपटलीय (Multiplex) चित्रपटगृहे सुरू झाली. महाराष्ट्र शासनाने सुरू होण्यापूर्वी राष्ट्रगीताची ध्वनिचित्रफीत वाजवण्याची सक्ती केली. राष्ट्र मान म्हणून काही लोक उभे राहत, तर काहीजण हातांतील शीतपेये वा खाद्यप आस्वाद घेणे चालूच ठेवत. कोणी मोबाईलवर बोलत राहात. सुसंस्कृत, सु म्हणवणारे नागरिकही राष्ट्रगीताचा मान राखण्यासाठी फक्त एक मिनिट शांतप राहू शकत नाहीत, ही दुर्दैवाचीच गोष्ट आहे.

२०१० मध्ये मराठी अभिनेता पुष्कर श्रोत्री याने तयार केलेली ध्वनि उपयोगात आणली गेली. मराठी नाट्यचित्रसृष्टीतील व संगीतक्षेत्रातील साठ कलाकारांना घेऊन ही ध्वनिचित्रफीत तयार केली होती. शासकीय नियमानु

बावन्न सेकंदांचीच होती. ध्वनिमुद्रण कोरस स्वरूपाचेच होते, परंतु प्रत्यक्ष चित्रित करताना सुरुवातीच्या काही ओळी वैयक्तिक एकेका कलाकारावर चित्रित करण्यात आल्या होत्या. अशी पद्धत योग्य आहे की नाही, यावर वृत्तपत्रांमधून दोन्ही बाजूंनी बरीच चर्चा करण्यात आली. अर्थात हा प्रकार पहिल्यांदाच झाला नव्हता. भारतबाला प्रॉडक्शनने १९९७-९८ च्या सुमारास 'जन-गण-मन' या नावाने प्रथम एक कॅसेट व अलीकडे दोन सीडींचा संच बाजारात आणला. त्यांपैकी एक व्हिडिओ डीव्हीडी आहे. भारतातील शास्त्रीय संगीत, लोकसंगीत व सुगमसंगीत या क्षेत्रांतील नामवंत वादकांना एकत्र आणून 'जन-गण-मन' सादर केले आहे. त्यातील प्रत्येकाने 'जन-गण-मन'मधील एक किंवा दोन ओळी स्वतंत्रपणे सादर केल्या आहेत. 'जन-गण-मन'च्या संदर्भात असलेल्या प्रोटोकॉलप्रमाणे असे करणे नियमबाह्य आहे; परंतु या नियमांची पायमल्ली उघडपणे या ध्वनिचित्रफितीत केलेली आहे. या चित्रफितीत राष्ट्रगीताचे अधिकृत असलेले फक्त पहिलेच कडवे घेतले आहे.

या संदर्भात ध्वनिमुद्रिकांचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. सुरेश चांदवणकर लिहितात, 'जन-गण-मन' च्या या रीमिक्सकडे बालिश प्रयोग समजून दुर्लक्ष करावे, तर गेली सात वर्षे जे दुसरं रीमिक्स टी.व्ही. वाहिन्यांवर आवर्जून दाखवले जाते आणि त्याचे कौतुक तत्कालीन पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी व राष्ट्रपती के. आर. नारायणन् यांनी शुभसंदेश देऊन केलेले आहे, ते खरोखरीच गंभीरपणे विचार करायला लावणारे आहे. २००० साली भारतीय प्रजासत्ताकाला पन्नास वर्षे झाली, म्हणून 'भारतबाला प्रॉडक्शन्स'ने ही व्हिडीओ फिल्म तयार केली असून, सोनी म्युझिकतर्फे ती वितरित करण्यात आली. खरे म्हणजे राष्ट्रगीताची व्हिडीओ/ध्वनिमुद्रिका विकू नये, असा संकेत असताना पाचशे रुपयांना हा 'जन-गण-मन' अल्बम बाजारात विक्रीला मांडण्यात आलेला आहे. संगीतकार ए. आर. रहमान यांच्या मार्गदर्शनाखाली अनेक थोर मंडळी राष्ट्रगीताची आपापली ओळ अगदी हातवारे करीत, ताना मारत, मुरक्या घेत, हसत-खिदळत रीमिक्स गाऊन गेली आहेत. यात कोण नाही ? 'भारतरत्न' लता मंगेशकर आहेत. त्यांच्या भगिनी आशा भोसले आहेत. शिवाय पं. भीमसेन जोशी, पं. जसराज, बालमुरलीकृष्ण, डी. के. पट्टामल, भूपेन हजारिका व स्वत: रहमानसाहेब आहेत. पावणेदोन मिनिटे ही मंडळी आपापल्या वाटणीची ओळ गाऊन शेवटी 'एकत्र' गाताना दिसतात. याची स्वतंत्र वाद्यसंगीताची ध्वनिचित्रफीतही यात आहे. त्यात बिस्मिल्लाखान सोडले, तर सर्व प्रथितयश वादक कलाकार आहेत व राष्ट्रगीत म्हणजे एखादी शास्त्रीय संगीताची बंदिशच असावी, असे फर्मास वादन झालेले यात पाहायला व ऐकायला मिळते. याचेही दर्शन टीव्हीवरून होत असतेच. याशिवाय अल्बममधल्या इतर पन्नासेक कलावंतांनी राष्ट्रगीताचे एकल (सोलो) गायन (?) करण्याचा अद्भुत चमत्कार केलेला आहे. ही ध्वनिचित्रफीत आता सायबरविश्वात विराजमान झाली असून, केव्हाही तो जादूचा

दिवा घासला की, कॉम्प्युटरच्या पडद्यावर ती हजर होते...

"या रीमिक्स अल्बमच्या शुभसंदेशात (१८ जानेवारी २०००) पंतप्रधान वाज म्हणतात, 'भारतीय प्रजासत्ताकासाठी ज्यांनी संघर्ष व त्याग केला, त्यांना देशात थोर कलाकारांनी वाहिलेली ही कलात्मक आदरांजली आहे.' गेली सात वर्षे व्हिडिओ फिल्म सतत टीव्हीवर दाखवल्याचा एक परिणाम असा की, आज शा कॉलेजांमध्ये सर्रास पेटी, पियानोवर सूर धरून राष्ट्रगीतगायन केले जाते. हे राष्ट्रगीत समूहगायनाच्या रूढ व रुजलेल्या संकेतांविरुद्ध आहे, हेच आज विसरले लागले आहे." (डॉ. सुरेश चांदवणकर, रिमिक्स राष्ट्रगीताचे, लोकसत्ता, १२ ऑगस्ट २

आजच्या पिढीचे अग्रगण्य संगीतकार ए. आर. रहमान यांनी या ध्वनिचित्रफि संगीत संयोजन केले आहे. यातील चित्रण लडाखच्या पार्श्वभूमीवर सेनादला सैनिकांवर तसेच देशातील सामान्य लोकांवर केले आहे. यात ध्वजारोहणा चित्रण आहे. लता मंगेशकरांसारख्या 'भारतरत्न' प्राप्त सन्माननीय गायिकेनेही ध्वज रंगांचे काठ असलेली साडी परिधान केलेली दिसते. गळ्यातील अलंकारांवरही दिसतात. राष्ट्रगीत सादर करताना प्रत्येक कलाकाराचे वेगवेगळे भाव दिस कुणाच्या चेहऱ्यावर अत्यंत वेदनादायी तर कुणाच्या चेहऱ्यावर दुःखी भाव, स्वत: रहमान मायकल जॅक्सनप्रमाणे किंचित नाचत, हातवारे करत राष्ट्रगी सादरीकरण करतात.

या ध्वनिचित्रफितीतील सर्व कलाकार भारतीय शास्त्रीय संगीताच्या क्षेत्र अत्यंत सन्माननीय कलाकार असले, तरीही आपण राष्ट्रगीताचे सादरीकरण क आहोत, याचे भान दुर्दैवाने या कलाकारांनाही नाही. याचे मुख्य कारण ध्वनिचित्रफितीच्या निर्मात्यांनाच ही जाण नाही. ही ध्वनिचित्रफित सात दूरचित्रवाणी व इतर वाहिन्यांवर गेली अनेक वर्षे दाखवली जात आहे. त परिणाम सामान्यांवर काय होईल, राष्ट्रगीतासंबंधीचे नेमके नियम यात पाय तुडवले जात आहेत व उद्या सामान्य जनताही त्याचे अनुकरण करेल याचा कोणीही केलेला दिसत नाही. काही संस्थांनी व व्यक्तींनी याविरुद्ध आवाज उठ परंतु त्याचाही फारसा उपयोग झाला नाही.

ऑगस्ट २००७ मध्ये 'दि कोड रेड फिल्म्स'निर्मित 'वुई दि पीपल!' ही मिनिटांची फिल्म अनेक दूरचित्रवाहिन्यांवर दाखवली जात होती. या फिल शेवटी अमिताभ बच्चन यांचा आवाज ऐकू येतो – 'राष्ट्रगीत का सम्मान यानी का सम्मान !' यात सुरुवातीला ऑगस्ट महिन्यातले कुंद पावसाळी वातावर मुंबईतली बेस्ट (BEST) बस पार्श्वभूमीवर दिसते. पाणीपुरी खात असलेल्या बुरखाधारी मुस्लिम तरुणी, तिथे धावलेली शाळकरी मुलगी, पेपर विकणा वाऱ्याने उडालेली तारांबळ, घड्याळजीपासच्या चहाच्या कपात पडलेला पा टपोरा थेंब, गर्दुल्ला भिकारी निपचित पडलेला.... असे सगळे टिपत टिपत

द टाइम्स ऑफ इंडिया व सारेगम निर्मित 'जय हे' ही २०११ मध्ये निघालेली ध्वनिचित्रफीत.

म्हाताऱ्या, पांगळ्या चांभारावर स्थिर होतो. तो हातातला ट्रान्झिस्टर रेडिओ चालू करतो व मध्येच शुभा मुद्‌गलांच्या आवाजात राष्ट्रगीताच्या अतिशय संथ लयीत गायलेल्या ओळी ऐकू येतात. लगबगीने म्हातारा कुबडीवर तोल सावरत राष्ट्रगीताच्या सन्मानार्थ अटेंशनमध्ये उभा राहतो. चष्म्यावर पावसाच्या पाण्याच्या धारा पडताहेत. ते बघून शेजारीच बसलेली तीन छोटी मुले एकमेकांना खुणावून बूटपॉलिश सोडून अटेंशनमध्ये उभी राहतात. समोर रस्त्यावर वर्दळ आपल्या गतीने चालूच आहे. आणि अमिताभ बच्चन यांचा आवाज घुमतो –

'राष्ट्रगीत का सन्मान करने में शर्म कैसी ? राष्ट्रगीत का सम्मान यानी राष्ट्र का सम्मान !'

याचीच इंग्रजी आवृत्तीही अधूनमधून दाखवली जाते.

खरे तर आकाशवाणीवरून सर्वसाधारणपणे 'जन-गण-मन' वाजवले
नाही. केवळ राष्ट्रपतींच्या राष्ट्राला उद्देशून असणाऱ्या भाषणापूर्वी त्याचे ध्वनि
प्रसारित केले जाते. रोज सकाळी आकाशवाणीच्या कार्यक्रमांची सुरुवात हो
प्रथम ज्याप्रमाणे 'वन्दे मातरम्' वाजवले जाते, त्याप्रमाणे 'जन-गण-मन' वाज
जात नाही. याची कल्पना या फिल्मच्या निर्मात्यांना दिसत नाही. आपले राष्ट्र
म्हणजे एखादे जाहिरातीचे जिंगल आहे काय? किंवा ते चालू असताना वाह
खंडित करून रस्त्यावरच्या लोकांनी जागीच थांबावे असा संदेश यातून जातो.

अगदी नुकतीच १५ ऑगस्ट २०११ मध्ये 'द टाईम्स ऑफ इंडिया'तर्फे '
गा मा' कंपनीकडून रवीन्द्रनाथांच्या १५० व्या जयंतीवर्षानिमित्त 'Collect
Special / Limited Edition' अशी 'जय हे' ही दोन सीडींची विशेष आ
प्रकाशित झाली आहे. याचे संगीत सौम्यजीत दास व सुरेंद्रु मलीक यांचे आहे. य
पंडित जसराज, उस्ताद गुलाम मुस्तफा खाँ, गिरीजादेवी, पंडित शिवकुमार श
पंडित विश्वमोहन भट, पंडित हरिप्रसाद चौरसिया, सुरेश वाडकर, हरिहरन,
महादेवन् अशी नामवंत मंडळी आहेत. यामध्ये रवीन्द्रनाथांच्या काही महत्त्व
गीतांबरोबर 'जन-गण-मन' हे संपूर्ण गीत घेतले आहे. भारतीय राज्यघटनेनुसार
संपूर्ण गीत गाण्यास परवानगी नाही. तरीही त्याचे उल्लंघन येथे केलेले दिसते.

'जन-गण-मन'ची मूळ रवीन्द्रनाथांची संगीतरचना स्वातंत्र्यपूर्व काळा
कोणीही बदललेली नाही आणि प्रोटोकॉलप्रमाणे आता ती बदलताही येत ना

'जन-गण-मन'ची संगीतरचना एकच राहिल्यामुळे त्याची फारशी ध्वनि
निघाली नाहीत. अलीकडे देशभक्तिपर गीतांच्या अनेक ध्वनिमुद्रणांमध्ये इतर गाय
गायलेल्या 'जन-गण-मन'चा समावेश असतो, पण त्यात मूळ रचनेपेक्षा वेग
कोणताच नसल्यामुळे त्याची विशेष दखल घेतली जात नाही.

राष्ट्रगीताच्या संगीतासारख्या किंवा सादरीकरणासारख्या विषयात सामान्य
तर उदासीन आहेच, पण कमालीची बेफिकीरही आहे. सरकारी पातळीवर याबा
आनंदीआनंदच आहे. प्रशासकीय पातळीवर मात्र राष्ट्रपती, राज्यपाल, राज
कार्यक्रम या संदर्भात राष्ट्रगीताचे संकेत योग्य रीतीने पाळले जातात, ही त्या
त्यात समाधानाची गोष्ट आहे.

राष्ट्रगीताच्या सादरीकरणाच्या संदर्भात आजचीच परिस्थिती कायम राहिल
जनसामान्यांमध्ये याविषयी जागरूकता निर्माण करण्यासाठी तसेच उद्याच्या पि
राष्ट्रगीतासंबंधी यथोचित आदरभावना निर्माण करण्यासाठी सामाजिक पात
पावले उचलावी लागतील.

सामाजिक संस्थांना यात पुढाकार घ्यावा लागेल. सरकारी पातळीवरही
प्रयत्न सुरू होणे गरजेचे आहे.

असा प्रयत्न माजी न्यायाधीश रंगनाथ मिश्र यांनी २००१ मध्ये सर्वोच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायाधिशांना एक पत्र पाठवून केला होता. या पत्रात ‘सरकार व न्यायपीठ राष्ट्रगीताच्या कायद्यांच्या अंमलबजावणीबद्दल किती गंभीर आहे व यात सर्वोच्च न्यायालयाने हस्तक्षेप करण्याची गरज आहे’ असे लिहिले होते.

हेच पत्र जनहित याचिका म्हणून सर्वोच्च न्यायालयाने दाखल करून घेतली. त्यावेळी निर्णय देणाऱ्या त्या दोन न्यायाधिशांना हे प्रश्न केरळमधील ( बिजोई इमॅन्युअल वि. केरळ सरकार सुप्रिम कोर्टातील खटला क्र. ७४८ सन १९८७ चा निवाडा) या खटल्यासंदर्भात आहे, असे वाटले व त्यांनी यासाठी खंडपीठ स्थापन करावे, असे सुचविले.

त्यानुसार स्थापन झालेल्या खंडपीठाने पहिल्याच तारखेला या याचिकेतील प्रश्नांचा केरळ खटल्याशी काहीही संबंध नाही, असे स्पष्ट करून हा खटला निकाली काढला होता.

त्यामुळे रंगनाथ मिश्र यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांबाबत सरकार व न्यायपीठ उदासीन आहे, हेच स्पष्ट झाले व रंगनाथ मिश्र यांनी उपस्थित केलेले राष्ट्रगीताच्या कायद्यांच्या अंमलबजावणीबाबतचे मूलभूत प्रश्न अनुत्तरितच राहिले.

निवडणूक आयोगाचे अध्यक्ष झाल्यानंतर टी. एन. शेषन यांनी पूर्वीच्याच नियमांची अंमलबजावणी अधिक कडकपणे करण्यास सुरुवात केली. निवडणूक प्रक्रियेला त्यांनी एक अत्यंत विधायक दिशा दिली. हे करताना त्यांनी कोणतेही नवीन नियम केले नव्हते, हे विशेष. राष्ट्रगीत, राष्ट्रध्वज व राजमुद्रा या आपल्या राष्ट्रीय प्रतीकांच्या वापराबाबत असलेल्या घटनेतील नियमांची अंमलबजावणी जनतेकडून पुरेशा सजगपणे होत नाही, ही वस्तुस्थिती आहे व त्याबाबत जागरूकता निर्माण करण्यासाठी शेषन यांच्याप्रमाणे सरकारी यंत्रणेमधील अधिकारी व्यक्तीने किंवा संस्थेने कडकपणे पाठपुरावा करणे आवश्यक आहे.

राष्ट्रगीताबद्दल जागरूकता निर्माण करण्यासाठी प्रयत्न करायला लागणे हीच खरे तर दुर्दैवाची गोष्ट आहे. देशभक्ती ही प्रत्येकामध्ये अंगीकृत असतेच व ती राष्ट्रगीताच्या माध्यमातून सार्वजनिकरीत्या प्रकट होत असते. या प्रगटीकरणाच्या वेळी शिस्त, सन्मान आणि राष्ट्रभक्ती या सर्वांचे दर्शन घडले पाहिजे.

# परिशिष्टे

## जय हे भारतभाग्यविधाता ।

(मराठी अनुवाद)

जन-गण-मन अधिनायक जय हे भारतभाग्यविधाता !
जय हे, जय हे, जय जय तुज, अभिनव भारतनाथा !
सिंधु, पंच, गुजराथ, मराठा, द्राविड, उत्कल, बंग;
विंध्य, हिमाचल, यमुना, गंगा, पूनित-जलधि-तरंग;
ही तव नामे जागी, होउनि आशीलागी
गाती तव जयगाथा, जन-गण-मंगलदायक जय हे
भारत-भाग्य-विधाता ! ।।१।।

ऐकुनि वाणी नव होती त्या नित्य प्रचारित नादी
हिंदू, बौद्ध, शिख, जैन, पारसिक, ख्रिस्ति, मुसलमानादि,
पश्चिमपूर्व मिळोनी, प्रेम-हार गुंफोनी
अर्पिति तुज निज हाता, जन-गण-ऐक्य-विधायक जय हे
भारत-भाग्य विधाता ।।२।।

पतन-अभ्युदय-बंधुर-मार्गी युगि युगि धावति यात्री,
चिरसारथी! तव रथचक्रे हो मुखरित पथ दिनरात्री,
दारुण-विप्लव माजे, तव शंखध्वनि गाजे
संकट-दु:ख-त्राता’
जन-गण-दु:ख-त्रायक जय हे
भारत-भाग्य-विधाता ।।३।।

घोर-तिमिर-घन-निबिड-निशीथी, पीडित-भेसूर-काली,
जागृत राहुनि अनिमिष-नयनी निज पुत्रां सांभाळी
दु:स्वप्नी, आतंकी, घेउनी त्यांना अंकी,
स्नेहमयी तू माता !
जन-गण-पथ-परिचारक जय हे
भारत-भाग्य-विधाता ।।४।।

प्रभात होउनि दिसत रवि-च्छवि पूर्व-उदय-गिरि-भाली,
गाती विहंगम, पुण्य समीरण नव-जीवन-रस घाली;
तव करुणारुण-रागे, भारत होउनि जागे
ठेवी तव पदि माथा
जय हे, जय हे, जय राजेश्वर भारत-भाग्य-विधाता !
जय हे, जय हे, जय जय जय तुज, अभिनव-भारत-नाथा! ।।५।।

**मराठी भाषांतर – नारायण महादेव भिडे**

# ‘जनगणमन’

(हिंदी अनुवाद)

‘जनगणमन’-अधिनायक जय हे भारत-भाग्य-विधाता ।

पंजाब सिन्धु गुजरात मराठा द्राविड उत्कल बंग
विन्ध्य हिमाचल यमुना गंगा उच्छल जलधितरंग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिष मांगे,
गाहे तव जय-गाथा ।
जनगणमंगलदायक जय हे ! भारत-भाग्य-विधाता ।
जय हे ! जय हे ! जय हे ! जय जय जय, जय हे ।।१।।

निशि-दिन तेरा आह्वान प्रचारित, सुनूँ तेरी उदार वाणी
हिन्दु, बौद्ध, सिख, जैन, पारसी, मुसलमान, खृस्तानी,
पूरब पश्चिम आयें सिंहासन- तले तेरे, प्रेमहार गुँथ जाता,
जण-गण-ऐक्य-विधायक जय हे ! भारत-भाग्य-विधाता,
जय हे ! जय हे ! जय हे ! जय जय जय, जय हे ।।२।।

पतन-अभ्युदय-दुर्गम-पथ में धाये यात्री युगों से -
हे चिरसारथि ! दिवस-रात गूँजे तेरे रथ-चक्रों में,
भीषण विप्लव गरजे, तेरी शंखध्वनि बाजे, संकट-दुःख के त्राता,
जनगणपथ-परिचायक जय हे ! भारत-भाग्य-विधाता,
जय हे ! जय हे ! जय हे ! जय जय जय, जय हे ।।३।।

पीड़ित मूर्छित देश की घोर तिमिरघन निविड़ रात में
तेरा अविचल मंगल जाग्रत, अपलक नत नयनों से,
दुःस्वप्नों में, भय में, रक्षा की थी तूने, स्नेहमयी तू माता ।
जनगणके दुःखत्राता जय हे ! भारत-भाग्य-विधाता,
जय हे ! जय हे ! जय हे ! जय जय जय, जय हे ।।४।।

रात गयी, हुई उदित सूर्य-छवि, पूर्व उदयगिरि भाले,
गायें विहंगम, पुण्य समीरण, नव-जीवन-रस ढालें,
करुण अरुण तेरी रागे, निद्रित देश जगा दें, तेरे चरणों में नत माथा,
जय जय जय हे ! जय राजेश्वर ! भारत-भाग्य-विधाता,
जय हे ! जय हे ! जय हे ! जय जय जय, जय हे ।।५।।

**हिंदी अनुवाद - दाऊलाल कोठारी**

# Jana Gana Man

THOU art the ruler of the minds of all peopole,
thou Dispenser of India's destiny.
Thy name rouses the hearts of the Punjab, Sind,
Gujrat and Maratha of Dravid, Orissa and Bengal.
It echoes in the hills of the Vindhyas and Himalayas,
mingles in the music of Jumma and Ganges,
and is chanted by the waves of the Indian Sea...
They pray for the blessing and sing thy praise.
Thous Dispenser of India's destiny,
Victory, victory, Victory to theee.........................I

Day and night, thy voice goes out from land to land,
calling Hindus, Buddhists, Sikhs and
Jains round thy throne and Parsess,
Mussalmans and Christians.
Offerigns are brought to thy shrine by the East and the West
to be woven in a garland of love.
Thou bringest the hearts of all people into
the harmony of one life,
Thou Dispenser of India's destiny,
Victory Victory, Victory to thee.........................II

Eternal Charioteer, thou drivest man's history
along the road rugged with rises and falls of Nations.
Amidst all tribulations and terror
thy trumpet sounds to hearten those that despair and droop,
and guide all people in their paths of peril
and pilgrimage.
Thou Dispenser of India's destiny,
Victory Victory, Victory to thee..........................III

When the long dreary night was dense with gloom
and the country lay still in a stupor,
thy Mother's arms held her.
thy wakeful eyes bent upon her face,
till she was rescued from the dark evil dreams
that oppressed her spirit,
Thou Dispenser of India's destiny,
Victory Victory, Victory to thee..........................IV

The night drawns, the sun rises in the East,
the birds sing, the morning breeze brings a stir of new life.
Touched by the golden rays of thy love
India wakes up and bends her head at thy feet.
Thou King of all kings. Thou Dispenser of India's destiny,
Victory Victory, Victory to thee..........................V

(Source :
Poems, Rabindranath Tagore,
Calcutta, Visva-Bharati, 1946 pp 68-69).
Translation of original Bengali poem
by Rabindranath Tagore himself.)

## The Morning song of India

Thou art the ruler of the minds of all people, dispenser of India's destiny. Thy name rouses the hearts of the Panjab, Sind, Gujrat and Maratha, of Dravid and Orissa and Bengal; it echoes in the hills of the Vindhyas and Himalayas, mingles in the music of the Ganges and the Jamuna and is chanted by the surging waves of the Indian Sea. They pray for thy blessings and sing thy praise. The saving of all people waits in thy hand, thou dispenser of India's destiny.

Victory, victory, victory to thee.

Day and night thy voice goes out from land to land calling the Hindus, Buddhists, Shikhs and Jains round thy throne and the Parsees, Musalmans and Christians. The East and the West join hands in their prayer to thee, and the garland of love is woven. Thou bringest the hearts of all people into the harmony of one life, thou dispenser of India's destiny.

Victory, victory, victory to thee.

The procession of pilgrims passes over the endless road rugged with the rise and fall of nations; and it resounds with the thunder of thy wheels, Eternal Charioteer! Through the dire days of doom thy trumpet sounds and men are led by thee across death. Thy finger points the path to all people. Oh dispenser of India's destiny!

Victory, victory, victory to thee!

The darkness was dense and deep was the night. My country lay in a deathlike silence of swoon. But thy mother arms were round her and thine eyes gazed upon her troubled face in sleepless love through her hours of ghastly dreams. Thou art the companion and the saviour of the people in their sorrows, thou dispenser of India's destiny.

Victory, victory, victory to thee!

The night fades; the light breaks over the peaks of the Eastern hills; the birds begin to sing and the morning breeze carries the breath of new life. The rays of thy mercy have touched the waking land with their blessings. Victory to thee King of kings, Victory to thee, thou dispenser of India's destiny.

Victory, Victory, victory to thee.

Rabindranath Tagore

Feb 28, 1919

Facsimile of the poet's English translation of *Janaganamana* in his hand,

# आझाद हिंद सेनेचे राष्ट्रगीत

सुभाषचंद्र बोस यांनी आझाद हिंद सेनेसाठी जन-गण-मनच्या शब्दरचने हे गीत लिहून घेतले. हे गीत जन-गण-मनच्या रवीन्द्रनाथांनी केलेल्या स्वररचनेनु आझाद हिंदसेनेमध्ये राष्ट्रगीत म्हणून गायले जाई.

शुभ-सुख चैनकी बरखा बरसे भारत भाग है जागा
पंजाब सिंध गुजरात मराठा द्राविड उत्कल बंगा
चंचल सागर विंध्य हिमाला नीला जमना गंगा
तेरे नित गुण गाये । तुझसे जीवन पाये ।
सब तन पाये आशा ।
सूरज बन कर जग पर चमके भारत नाम सुभागा
जय हो, जय हो, जय हो,
जय जय जय जय हो ।।१।।

सब के दिल में प्रीत बसाये तेरी मीठी वाणी
हर सूबे के रहने वाले हर मजहब के प्राणी
सब भेद-ओ-फरक मिटा के ! सब गोद में तेरी आके
गूँथे प्रेम की माला
सूरज बन कर जग पर चमके भारत नाम सुभागा
जय हो, जय हो, जय हो,
जय जय जय जय हो ।।२।।

सुबह सवेरे पंख पखेरू तेरे ही गुण गायें
बास भरी भरपूर हवाएं - जीवन में रुत लाएं
सब मिलकर हिन्द पुकारें - जय आजाद हिंद के नारे
प्यारा देश हमारा ।
सूरज बन कर जग पर चमके भारत नाम सुभागा
जय हो, जय हो, जय हो,
जय जय जय जय हो
भारत नाम सुभागा ।।३।।

# 'जन-गण-मन'ची ध्वनिमुद्रणे

'जन-गण-मन'ची मूळ संगीतरचना स्वत: रवीन्द्रनाथांचीच असल्यामुळे त्यांच्या चालीमध्ये कोणीही बदल केलेला नाही. उपलब्ध सर्व ध्वनिमुद्रिका एकाच संगीतरचनेतील (चालीतील) आहेत. फक्त गीत सादर करण्याची पद्धत व गायनशैली यांत फरक आहे.

*ज्या ध्वनिमुद्रिकेत 'जन-गण-मन' पूर्ण पाच कडव्यांचे घेतले आहे. तेथे ही खूण आहे.

| रेकॉर्ड नं. व कंपनी | कलाकार |
|---|---|
| १. H 191 (हिंदुस्थान) | शांतिदेवी घोष, आमला दत्ता, सुधीन दत्ता |
| २. H 570 (हिंदुस्थान) | जया दास, धीरेन गुप्ता, विजया दास, हरिपद चटर्जी |
| ३. VE 2534 (कोलंबिया) | *बंगाली चित्रपट - 'उदय पॅथे' व हिंदी चित्रपट - 'हमराही', संगीत - हेमंतकुमार मुखर्जी, (एका बाजूला समूह स्वरात गायन व दुसऱ्या बाजूला केवळ हमिंगच्या स्वरूपात) |
| ४. N 16939 (एच.एम.व्ही.) | कोरस |
| ५. N 27829 (एच.एम.व्ही.) | जगन्मोय मित्र, धीरेन चौधरी, देबब्रत बिश्वास, निहारबिंदू सेन, कनक बिश्वास, सुचित्रा मुखर्जी, सुप्रिती घोष, गीता नाहा, दिग्दर्शक - आनंदी दस्तिदार |
| ६. N 20015 (एच.एम.व्ही.) | कोरस |

| | |
|---|---|
| ०७. N 80125 (एच.एम.व्ही.) | आकाशवाणी गायकवृंद (मुख्य स्वर पं. दिनकर कायकिणी व डॉ. सुमती मुटा |
| ०८. N 80232 (एच.एम.व्ही.) | आकाशवाणी गायकवृंद |
| ०९. 7EPE 1006 (एच.एम.व्ही.) | आकाशवाणी गायकवृंद |
| १०. CA711/MD1380 (ओडियन) | *के. अश्वत्थामा - राग आमीर कल्याणी |
| ११. (कच्चे ध्वनिमुद्रण) विक्रीस आली नाही. | *मा. कृष्णराव - समूह स्वर |
| १२.(कच्चे ध्वनिमुद्रण) विक्रीस आली नाही. | मा. कृष्णराव - २० सेकंदांचे दोन छोटे तुकडे, ध्वजारोहण व ध्वजावतरण यांसाठी उपयुक्त |
| १३. जन-गण-मन | |
| १ सीडी व १ डीव्हीडी - | भारतबाला प्रॉडक्शन - संगीत : ए.आर. रहमान, कलाकार - पं. हरिप्रसाद चौरसिया, पं. भीमसेन जोशी, पं. विश्वमोहन भट, विक्कु विनायकम्, डी. के. पट्टम्माळ आणि नित्यश्री, उस्ताद अमजद अली खाँ, अमान अली बंकश, अयान अली बंकश, पं. जसराज, लता मंगेशकर, उस्ताद सुलतान खाँ, एस. पी. बालसुब्रमण्यम्, पं. शिवकुमार शर्मा व राहुल शर्मा, डॉ. बालमुरलीकृष्ण, शोभा गुर्टू, रविकिरण, उस्ताद गुलाम मुस्तफा खान, गुलाम मुर्तूझा खान, गुलाम कादीर खान, भूपेन हजारिका, सादीक खान लांगा, पं. कार्तिककुमार व नीलाद्री कुमार, सुधा रघुनाथन आणि पी. उन्नीकृष्णन्, जगजीत सिंग, रशीद खान, आशा भोसले, कुमारेश आणि गणेश, गायत्री, बेगम परवीन सुलताना, पं. अजय चक्रवर्ती, कौशिकी चक्रवर्ती, हरिहरन्, कविता कृष्णमूर्ती, सडोलीकर व इंडियन आर्मी, इंडियन नेव्ही. |
| १४. जन-गण-मन व्हीसीडी | निर्मिती - पुष्कर श्रोत्री, संगीत नियोजन - महेश खानोलकर व अप्पा वढावकर. |
| १५. जय हे एक ऑडिओ सीडी व एक डीव्हिडी | *टाइम्स म्युझिक, निर्मिती - सारेगम व द टाइम्स ऑफ इंडिया, (रवीन्द्रनाथांच्या १५० व्या जयंती वर्षानिमित्ताने भारत सरकारच्या सहकार्याने |

यांचा संच प्रसृत) संगीत – सौम्यजीत दास व सौरेंद्र मलीक, निर्मिती सूत्रधार व निवेदन – हर्षवर्धन नोटिया, कलाकार – कविता कृष्णमूर्ती, रेखा भारद्वाज, विश्वमोहन भट, जावेद अली, उस्ताद गुलाम मुस्तफा खाँ, रूपकुमार व सोनाली राठोड, पं. अजय चक्रवर्ती, लेसले लुईस, गिरिजादेवी, रिचा शर्मा, लखनदास बाऊल, उषा उत्थप, पं. शिवकुमार शर्मा, महालक्ष्मी अय्यर, लोपामुद्रा मित्रा, हरिहरन, के. एस. चित्रा, शंकर महादेवन, श्रीकांत आचार्य, अलका याज्ञिक, जगजितसिंह, डॉ. एम. बालमुरलीकृष्ण, श्रावणी सेन, सुरेश वाडकर, नित्याश्री, डॉ. एल. सुब्रमण्यम्, शान, पं. जसराज, श्रीनिवास, अंबि सुब्रमण्यम्, सुनिधि चौहान, पी. सुशीला, पं. हरिप्रसाद चौरसिया, कैलास खेर, सोनू निगम, साधना सरगम

ध्वनिमुद्रिका सूची साहाय्य – डॉ. सुरेश चांदवणकर (सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स, मुंबई) व सुशांतकुमार चटर्जी (कलकत्ता)

# 'जन-गण-मन'च्या स्वरलिपी

## १ जनगणमन

(विश्वभारती स्वरलिपि)

सा रे ग ग। ग ग ग ग। [स]ग - ग ग। [ग]रे ग म -।
ज न ग ण म न अ धि ना ऽ य क ज य हे ऽ

[म]ग - ग ग। रे - रे रे। [सा]नि़ रे सा -। - - सा -।
भा ऽ र त भा ऽ ग्य वि धा ऽ ता ऽ ऽ ऽ पं ऽ

[सा]प - प प। - प प -। प - प [प]म। [म]प म [ध]प -।
जा ऽ ब सिं ऽ धु गु ज ऽ रा ऽ ठ म रा ऽ ठा ऽ

म - म म। म - म ग। [ग]रे म ग -। - - - -।
द्रा ऽ वि ड़ उत् ऽ क ल बं ऽ ग ऽ ऽ ऽ ऽ ऽ

[सा]ग - ग ग। ग - ग रे। [रे]प प प म। [प]म - म -।
विं ऽ ध्य हि मा ऽ च ल य मु ना ऽ गं ऽ गा ऽ

ग - ग ग। [ग]रे रे रे रे। [सा]नि़ रे सा -। - - - -।
उ ऽ च्छ ल ज ल धि त रं ऽ ग ऽ ऽ ऽ ऽ ऽ

ग ग ग ग। ग - ग म। [म]रे ग म -। - - - -।
त व शु भ ना ऽ मे ऽ जा ऽ गे ऽ ऽ ऽ ऽ ऽ

[सा]ग - ग -। रे रे [ग]रे रे [रे]नि़ रे सा -। - - - -।
गा ऽ हे ऽ त व ज य गा ऽ था ऽ ऽ ऽ ऽ ऽ

[सा]प प प प। प - प म। प - प प। [प]म ध [ध]प -।
ज न ग ण मं ऽ ग ल दा ऽ य क ज य हे ऽ

म - म म। [म]ग - ग ग म। [ग]रे म [म]ग -। - - नि नि
भा ऽ र त भा ऽ ग्य वि धा ऽ ता ऽ ऽ ऽ ज य

[न]सां – – – । – – [सां]निध । [ध]नि – – – । – – पप
हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ज य हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ जय

[प]ध – – – । – – – – । [ध]सासा रे रे । ग ग [ग]रे
हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ज य ज य ज य ज

म – – – । – – – – ।
हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ

---

## 2. JANAGANAMANA
(Notation by Herbert Murrill)

'जन– अधिनायक जय हे भारत भाग्य विधाता

पंजाब गुजरात मराठा द्राविड उत्कल बंग विंध्य हीं

माचल यमुना गंगा उच्छल जलधी तरंग तव शुभ नामे जागे

तव शुभ आशिष मागे गाये तव जय गाथा जनगणमन मंगल

दायक जय हे भारत भाग्यविधाता, जय हे जय

हे जय हे जय जय जय जय हे

# HINDI KAUMI TARANA

(Indian National Anthem)



Original notations of the National Anthem 'Subh sukh chain ki barkha barse' — opening lines
















Notations of the anthem — concluding lines



# The Poet's Letter to Lord Chelmsford, the Victeroy, repudiating his Knightood in protest for Jalianwallahbag mass killing.

The letter was published in The Statesman, June 3, 1919

Your Excellecney,
Rabindranath Tagore

The enormity for the measures taken by the Government in the Punjab for quelling some local disturbances has, with a rude shock, revealed to our minds the helplessness of our position as British subjects in India. The disproportionate severity of the punishments inflicted upon the unfortunate people and the methods of carrying them out, we are convinced, are without parallel in the history of civilized governments, barring some conspicuous exceptions, recent and remote.

Considering that such treatment has been meted out to a population, disarmed and resourceless, by a power which has the most terribly efficient organization for destruction of human lives, we must strongly assert that it can claim to political expendiency, far less moral justification. The accounts of the insults and sufferings by our brothers in Punjab have trickled through the gagged silence, reaching every corner of India, and the universal agony of indignation roused in the hearts of our people has been ignored by our rulers- possibly congratulating themselves for imparting what they imagine as salutary lessons.

This callousness has been praised by most of the Anglo-Indian papers, which have in some cases gone to the brutal length of making fun of our sufferings, without receiving the least check from the same authority, relentlessly careful in something every cry of pain of judgment from the organs representing the sufferers. Knowing that our appeals have been in vain and that the passion of vengeance is building the noble vision of statesmnship in our Government, which could so easily afford to be magnanimous, as befitting its physical strength and normal tradition, the very least that I can do for my country is to take all consequences upon myself in giving voice to the protest of the millions of my countrymen, surprised into a dumb anguish of terror.

The time has come when badges of honour make our shame glaring in the incongruous context of humiliation, and I for my part, wish to stand, shorn, of all special distinction, by the side of those of my countrymen who, for their so called insignificance, are liable to suffer degradation not fit for human beings. And these are the reasons which have compelled me to ask Your Excellency, with due reference and regret, to relieve me of my title of knighthood, which I had the honour to accept from His Majesty the King at the hands of your predecessor, for whose nobleness of heart I still entertain great admiration.

Yours faithfully,
RABINDRANATH TAGORE
Calcutta,
6 Dwarakanath Tagore Lane,
May 30, 1919.

# जालियाँवालाबाग हत्याकांडानंतर रवीन्द्रनाथांनी लिहिलेले प

*कविवर्य रवीन्द्रनाथ टागोर यांनी जालियाँवालाबाग हत्याकांडाच्या नि त्यांना दिलेली 'सर' ही पदवी परत करताना व्हाईसरॉय लॉर्ड चेम्सफोर्ड यां लिहिले. हे पत्र ३ जून १९१९ रोजी 'स्टेटस्‌मन' या वृत्तपत्रात प्रसिद्ध झाले.*

आदरणीय महोदय,

पंजाब प्रांतात काही स्थानिक समस्या सोडवण्यासाठी आपल्या शासन राक्षसी उपाय वापरले हे पाहून ब्रिटिश अमलाखालील आम्ही भारतीय जन झालो आहोत. निदर्शकांना देण्यात आलेली शिक्षा ही एवढी क्रूर व अमानवीय की सुसंस्कृत शासन असणाऱ्या एकाही देशात असे उदाहरण आढळून येणार अशी आमची खात्री झाली आहे.

नि:शस्त्र आणि हतबल निदर्शकांना आपण जी निर्दयपणाची वागणूक दि त्यांच्यावर राक्षसी शक्तीने हल्ला करण्यात आला. हा हल्ला इतका सुसूत्र होता यात त्या मानवी जीवांचे मरण ओढवणे साहजिकच होते. ह्या घटनेचे को राजकीय समर्थन आपणास करता येणार नाही, हे आम्ही निक्षून सांगतो. आ पंजाबी बांधवांवर आपण केलेल्या अमानुष हल्ल्यामुळे या देशातील सर्व काना हादरून गेला आहे. आमच्या सर्व देशबांधवांच्या मनात यामुळे संतापाची उठली आहे. हे शासन आहे की, दु:शासन असा प्रश्न येथील जनतेला पडला

ह्या बाबतीत जी प्रचंड उदासीनता दाखविण्यात आली त्याबद्दल सर्वच इंडियन पेपर्स व वृत्तपत्रांनी शासनाचे वाभाडे काढले आहे. काही ठिकाणी मृत विटंबना करण्यापर्यंत ह्या पाषाणहृदयी सैनिकांची मजल गेली आहे. ह्या प्र शासनाने कुठेही अटकाव केल्याचे दिसून येत नाही. पीडितांना न्याय देण्य शासनाने कुठलेही पाऊल उचललेले दिसून येत नाही. जनतेला जरब बसली या भावनेने शासनाला इतके झपाटलेले आहे की, त्यामुळे आमच्या सर्व वि व्यर्थ ठरणार आहेत. ह्या सर्व गोष्टी एवढ्या प्रचंड व अमानुष आहेत, की शक्तीने मी त्यांचे परिमार्जन करू शकत नाही. पण माझ्या हजारो बांधवांच्य भावना व्यक्त करणे एवढी गोष्ट मी करू शकतो.

आपण जी मला मानाची पदवी दिली ती मला आता लांच्छनास्पद वाटत अत्यंत भित्रेपणाने, निरागस, नि:शस्त्र बांधवांची जी क्रूर अवहेलना आपले करीत आहे, ते पाहता ही बिरुदावली मिरवणे मला लज्जास्पद वाटत आहे. ह कारणामुळे आपण मला दिलेली 'सर' ही पदवी परत घ्यावी, अशी मी करतो. आपण माझा सन्मान करण्यासाठी दिलेल्या ह्या बिरुदावलीबद्दल मला आदर आहे. तरीही माझी ही मागणी मान्य व्हावी, ही विनंती.

आपला वि

रवीन्द्रनाथ

# रवीन्द्रनाथ जीवनचरित्र - कालानुपट

| | | |
|---|---|---|
| [illegible] ते १८४६ | – | द्वारकानाथ ठाकूर (रवीन्द्रनाथांचे आजोबा) राजा राममोहन रॉय यांचे सहकारी |
| [illegible] ते १९०५ | – | महर्षी देवेन्द्रनाथ ठाकूर (रवीन्द्रनाथांचे वडील) बंगालमधील सामाजिक चळवळीतील प्रमुख. |
| [illegible] १८६१ | – | कलकत्ता येथील जोडा साँको या ठाकूर हवेलीत रवीन्द्रनाथांचा जन्म. (मातापित्यांचे चौदावे व शेवटचे अपत्य) औपचारिक शालेय वा महाविद्यालयीन शिक्षण नाही. घरीच शिक्षकांचे मार्गदर्शन. घरी विद्येच्या व कलेच्या क्षेत्रातील गुणिजनांचा सहवास. |
| [illegible] | – | 'अभिलाषा' ही कविता बिननावाने तत्त्वबोधिनी पत्रिकेत (नोव्हेंबर-डिसेंबर १८७४) प्रकाशित.<br>काही काळ कलकत्त्यातील सेन्ट झेवियर्स हायस्कूलमध्ये शिक्षण. याच सुमारास वडिलांबरोबर हिमालयात प्रवास. बोलपूर (ज्या ठिकाणी पुढे शांतिनिकेतनची स्थापना झाली) चे प्रथम दर्शन. |
| [illegible] फेब्रुवारी १८७५ | – | हिंदू मेळ्यात स्वत:ची 'भारत' कविता वाचली. (प्रथम जाहीर वाचन) व २५ फेब्रुवारी १८७५ च्या 'अमृत बझार' पत्रिकेत प्रकाशित. नावाने प्रसिद्ध झालेली पहिली कविता. |
| [illegible] १८७८ | | बंधू सत्येन्द्रनाथांबरोबर इंग्लंडमध्ये. स्कॉट कुटुंबामुळे युरोपियन संगीताची ओळख. |
| [illegible] फेब्रुवारी १८८१ | | पहिले नाटक 'वाल्मिकी-प्रतिभा'चा प्रयोग, स्वत: रवीन्द्रनाथांनी वाल्मिकीची भूमिका केली. |
| [illegible] १८८१ | | बेथ्युन सोसायटीच्या सभेत संगीतावर भाषण. रवीन्द्रनाथांचे हे पहिले जाहीर भाषण. चंद्रनगरला ज्योतिरेन्द्रनाथांच्या गंगा गीतावरील घरात विपुल पद्यरचना. |
| [illegible] डिसेंबर १८८३ | | भवतारिणी रायचौधुरी हिच्याबरोबर विवाह. नाव 'मृणालिनी' ठेवले. |
| [illegible] ऑगस्ट १८९४ | | सावित्री ग्रंथालयाच्या सभेत 'हाते कलम' या वाचलेल्या निबंधात स्वाभिमानशून्य पुढाऱ्यांवर प्रखर टीका. या भाषणामुळे सांस्कृतिक क्षेत्रात वादळ निर्माण झाले. |
| [illegible] | | राष्ट्रीय सभेचे दुसरे अधिवेशन कलकत्ता येथे. 'अमरा मिलेछि आज' हे कवितावाचन. रवीन्द्रनाथ त्याच सुमारास ब्राह्मो समाजाचे कार्यवाह. |
| [illegible]-१८८९ | | नाट्यलेखन. कादंबरीलेखन जोमाने सुरू. |
| [illegible] | | वडिलांच्या आज्ञेमुळे घरच्या जमिनदारीच्या कामकाजात लक्ष देवू लागले. |

